


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

७३

संपादक— श्री. रामचंद्र श्रीपाद जोग

पौष १८६६

वर्ष १८ वें ] जानेवारी १९४५ [अंक १ ला

अनुक्रमणिका



# अनुक्रमणिका


| विषय | पृष्ठ |
|---|---|
| रुबाया (शान्ता ज. शेळके) ... ... ... | १ |
| केशवसुत आणि डॉ. माधवराव पटवर्धन (रा. श्री. जोग)... ... | २ |
| याने मराठीच्या व्युत्पत्तीस काय अुपकार होणार? (गो. कृ. मोडक)... | ९ |
| अेका रोजनिशींतील नाट्यविषयक अुतारे (चिं. ग. कर्वे) ... ... | १३ |
| आडूचा खेळ (ग. ह. खरे) ... | १५ |
| परीक्षणें | १७ |
| परिषद्वार्ता | २९ |
| संपादकीय ... ... ... | ३१ |
| साभार स्वीकार | मलपृष्ठ २-३ |


---

## साभार स्वीकार

### के. भि. ढवळे, मुंबअी, यांचीं प्रकाशनें

१ चम्पाराणी— ले० वामन चोरघडे; मूल्य रु. १.
२ सोवती— ले० का. रा. पालवणकर; मूल्य आणे १२.
३ भक्त दामाजी— ले० पां. श्री. टिल्लू; मूल्य आणे ६.
४ आमचीं गाऱ्हाणीं— ले० ग. मा. वैद्य; मूल्य आणे ८.
५ धाडशी राजकन्या— ले० पां. अ. वेलणकर; मूल्य आणे ६.
६ गालगुच्चे— ले० सी. ल. देवधर; मूल्य आणे १२.
७ विषकन्या— ले० पु. मा. मावे; मूल्य रु. १॥.
८ माईच्या गोष्टी— ले० सौ. मालतीबाअी दांडेकर; मूल्य रु. १.
९ गुलछबू— ले० द. के. बर्वे; मूल्य आणे १०.
१० गालिव्हरचे प्रवास— ले० मा. म. गोरे; मूल्य आणे १०.
११ लिलूच्या लीला— ले० रत्नप्रभा घारपुरे; मूल्य आणे ४.
१२ बालपंचतंत्र— ले० त्र्यं. पु. थोरात; भाग १ व २, मूल्य प्रत्येकीं आणे ६.
१३ फोटोचें लग्न नि अितर लघुकथा— ले० वि. कृ. नेरुरकर; मूल्य रु. १॥.
१४ किशोर— ले० वि. भि. पेटकर; मूल्य रु. १.
१५ अुघडे लिफाफे— ले० ना. मा. संत; मूल्य रु. १॥.
१६ विसाव्याचे क्षण— ले० सौ. मालतीबाअी दांडेकर; मूल्य रु. १।.
१७ झेलम— ले० शरच्चंद्र टोंगो; मूल्य आणे १२.
१८ चांदोबाच्या निळ्या घरीं— ले० अशोक; मूल्य आणे १२.

[पुढील मजकूर मलपृष्ठ तीन वर पाहा.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## रुबाया

१ निळें गगन हें सुखप्रकाश ओती;
निसर्ग सारा सुखचि उधळितो भंवतीं.
मनुज असे हा भाग निसर्गाचाच—
तोच सुखाविण तृषार्त कां या जगतीं ?

२ मोहक्षणीं हें मन होई बेहोष;
अनुतापाने मागुन करि आक्रोश !
संयमी न हें, नच निर्लज्जहि तैसें
कुठुनि तया मग लाभावा संतोष !

३ मार्ग योग्य जो, कण्टक त्यावरि फार;
अयोग्य मार्गी आणि सुमनसंभार !
पांथ जरी मग अयोग्य मार्गें गेला—
दोष तयासच कां हो प्रभु देणार ?

४ तूं करुणेचें निधान असशी देवा,
दर्शनसौख्य न परी लाभतें केव्हा.
तुजहुनि तो सैतानच का न दयाळू—
क्षणोक्षणीं जो भेटुनि दे सुखठेवा ?

५ दुर्मिळ कविता जी दे सुख अभिराम,
मधुमें तर तें निषिद्ध आहे नाम,
आणि प्रियसखी मिळेच ना सांगाती;
नन्दनवन मग कोठे तव खय्याम ?

६ प्रीतीसंगें व्यथाच ये हृदयाची;
धनकीर्तीला जोड न शाश्वततेची.
वेदान्ती तर नेति नेति म्हणतात !
कुठे तृप्त हो भूक बरें चित्ताची ?

७ तृषा लागली हृदयाला प्रीतीची,
म्हणुनि सराई धुंडियली जगताची.
भिडतां प्याला ओठीं पण ये शंका—
प्रीतिसुधा ही, की मदिरा विषयाची ?

८ देहलालसेमधे प्रीतिची पूर्ती,
भक्ति कराया लागे आधी मूर्ती.
बन्धन पडतें शब्दांचें भावांना—
प्रभो ! काय ही तव जगतींची रीती !

९ स्नेह प्रेम वा, व्यर्थच अवघीं नातीं
अखेर जो तो ज्याल्यास्तव या जगतीं.
वेड्यापरि हे पाश निर्मितों आम्ही—
अन् विव्हळतों तुटतांना ते अन्तीं !

शान्ता ज. शेळके

# केशवसुत आणि डॉ. माधवराव पटवर्धन

रा. श्री. जोग

१. कै. डॉ. माधवराव पटवर्धन हे केशवसुतांचे सर्वांत मोठे चिकित्सक टीकाकार होत. केशवसुतांच्या कवितेवरील, अथवा खरें सांगावयाचें झालें म्हणजे स्वतः केशवसुतांवरील, त्यांचा मोठा आक्षेप म्हणजे केशवसुतांची मनोवृत्ति रोगट झाली होती हा होय. आपल्या केशवसुतांवरील प्रदीर्घ लेखामध्ये (अर्वाचीन वाङ्मयसेवक, भाग १, पृ. ९८ ते १७६) त्यांनी या आक्षेपाचें विस्तरशः विवेचन केलें आहे. 'रोगट'पणाचा अेक अर्थ त्यांनी पुढीलप्रमाणे सांगितला आहे :— कवीस सृष्टींतील विविध विषयांनी स्फूर्ति होअून त्याने काव्यें रचावींत हें स्वाभाविक आहे; त्याने कविता आणि कवि याच विषयावर पद्यें रचीत बसावें हें चमत्कारिक वाटतें. आपल्या कवित्वाची मधून-मधून अशी सारखी जाणीव होत राहणें हें अेक रोगटपणाचें लक्षण आहे (अ. वा. सेवक, पृ. १०६). 'आत्मकवित्वाची रोगट जाणीव' हा शब्दप्रयोग त्यांनी आणखीहि अेके ठिकाणीं केला आहे. यालाच ते वृत्तिवैपरीत्य म्हणतात. "कवित्वाचा अुगम, विकास व प्रभाव यांच्याविषयी केशवसुतांनी करून घेतलेल्या आत्त्या कल्पना आणि त्यांची आत्मकवित्वाची रोगट जाणीव यांनीच केशवसुतांची दारुण निराशा केली, आणि त्यांच्या वृत्तीस विपरीत करून टाकिलें." (अ. वा. सेवक, पृ. १२२). या वृत्तिवैपरीत्याचें आणखी वर्णन करतांना ते म्हणतात :— "प्रियेच्या प्रेमळ संगतीहून काव्यप्रसू विजनवसति त्यांना अधिक प्रिय झालेली दिसते" (पृ. १२३). श्री. माडखोलकर यांनी हेंच पुढील शब्दांत सांगितलें आहे :— "कवितेवर चेतनागुणाचा आरोप अेखाद्या कामार्ताप्रमाणे तिचें प्रणयाराधन करीत सुटणें, हा तरी अेक मानसिक विकलतेचा किंवा विकृतीचा प्रकारच म्हणावा लागेल." (अ. म. साहित्य, पृ. १२). श्री. पटवर्धनांनी या मुद्याचें सविस्तर अुपपादन, केशवसुतांनी काव्यदेवतेस अुद्देशून लिहिलेल्या कवितांची चर्चा करून, केलें आहे. वृत्तिवैपरीत्याचा आणखीहि अेक अर्थ पटवर्धनांना अभिप्रेत असावा असें वाटतें; तथापि त्यांनी त्याचें सविस्तर अुपपादन केलें नाही. त्यांचे शब्द असे आहेत :— "काव्यग्रंथांतील परोक्ष सृष्टीशीं निकट परिचय अकालींच झाल्याने प्रत्यक्ष सृष्टींत जी निराशा अुताविळपणाने होते ती त्यांस (त्यांची ?) झाली असावी, आणि जी अव्यवहारिता येते ती त्यांस बाधली असावी. या निराशेमुळेच प्रत्यक्ष सृष्टीपासून ते अधिकाधिक अलग राहिले असावेत." (अ. वा. से., पृ. १००). ही अुत्कट निराशेची अवस्था म्हणजेच मनाची विकृत अथवा रोगट वृत्ति असें पटवर्धनांस म्हणावयाचें असावें असेंहि वाटतें. या साऱ्याचा क्रमाने विचार करूं.

२. कवीने काव्यचर्चा करण्यापेक्षा काव्यलेखन करावें ही गोष्ट स्वाभाविक व अिष्ट अशी असली तरी 'कविता आणि कवि' यावर त्याने कांही लिहूंच नये असें नाही. के० सुतांच्या कवितेंत प्रस्तुत विषयावर बऱ्याच म्हणजे सुमारे १५-२० कविता आहेत. तथापि केवळ याच विषयावर त्यांनी लिहिलें आहे असें म्हणणें बरोबर नव्हे. अेकंदर १३२ पैकी १०० वर कविता काव्यविषयक नाहीत. अशी वस्तुस्थिति असतां 'याच विषयावर' के० सुतांनी पद्यें रचिलीं असें कोणत्या अर्थाने म्हणतां येअील हें समजणें कठीण आहे. केशवसुतांनी काव्यविषयक कविता अितक्या तरी कां लिहिल्या याचें कारण वेगळें आहे. त्यांच्या काव्यकल्पना पाश्चात्य धर्तीच्या होत्या. त्यांना धरून ते 'नवीं काव्यें' लिहीत होते. नव-काव्याचें स्वागत जेव्हा नीट होत नाही, तेव्हा तें काव्य लिहिणारे कवि आपल्या काव्यकल्पना स्पष्ट करीत असतात. रविकिरणमंडळाने सुनीतरचनेचा जेव्हा सपाटा चालविला होता, तेव्हा त्या मंडळांतील सभासदांनी गद्यांत का होअीना 'काव्यविचार' लिहिलाच,

पण सुनीत या विषयावर सुनीतें लिहून म्हणजे काव्यरचना करून आम्ही ताजमहाल अुभवितों असा गर्व वाहिलाच की नाही ? मुक्तच्छंदाचें स्वागत नीट होत नाही असें दिसतांच कवि अनिल यांनी त्याविषयी चर्चा केलीच ना ? के० सुतांच्या काळींहि जुनें काव्य व नवें काव्य असा प्रकार झालाच. नव्या काव्यपद्धतीचा पुरस्कार के० सुत काव्य लिहून करीत होते. काव्यविषयक कल्पना जेथे वादग्रस्त असतात तेथे कवींनाच तद्विषयक चर्चा करावी लागते हें शेले-वर्डस्वर्थ यांच्या अुदाहरणांवरून दिसून येतेंच. तेव्हा के० सुतांनी किंवा अितर कोणा कवीने काव्यचर्चा केली हें पाहून 'चमत्कारिक' वाटण्याचें कारण नाही. केशवसुतांनी ती पद्यांत केली; पटवर्धनांनी गद्यात केली आहेच.

३. काव्यविषयावर कविता लिहिणें आणि आत्मकवित्वाची जाणीव असणें यांतहि फरक करावयास हवा. केशवसुतांच्या बऱ्याच कविता सर्वसामान्य कवि व काव्य यांविषयी लिहिलेल्या आहेत. त्यांत ते स्वतःच्या कवित्वाचा अुल्लेख करीत नाहीत. अितर बऱ्याच ठिकाणीं प्रथम त्यांनी स्वतःचा अुल्लेख केला आहे. त्या सर्वच ठिकाणीं प्रथमपुरुषी सर्वनाम असलें तरी तेथे केशवसुतांना स्वतःचें कवित्व अभिप्रेत नसतें. कवीचा सामान्य अुल्लेख करावयाचा, त्याअैवजी ते 'मी' घालतात अेवढेंच. 'काव्य कोणाचें', 'सृष्टि आणि कवि' या कविता अशा आहेत. 'माझी दृष्टि असे अलौकिक' हा अुल्लेखहि स्वतःचा द्योतक समजण्यापेक्षा प्रतिभावान् कवींचा द्योतक समजला पाहिजे. स्वतःचा अुल्लेख जेथे थोड्याबहुत अंशाने केशवसुतांना अभिप्रेत असतो तेथे ते स्वतःकडे कमीपणाच घेतात असें दिसतें. 'कविता करितां मला न येअी', 'मी गणमात्रा जुळणारा', 'सौभाग्य पुष्पा । तव गावयाला । मी पात्र नाही' अित्यादि त्यांचे अुद्गार आहेत. आत्मकवित्वाची जाणीव असणें हेंहि रोगटपणाचें लक्षण कसें ठरतें ? Greatness is unconscious या कार्लाअिलवचनाचा हा दुरुपयोगच म्हणावयास हवा. बहुतेक मोठ्या कवींना ही जाणीव असतेच. कोणी ती विनयाने प्रकट करील, कोणी औद्धत्याने करील. ज्ञानेश्वर, मुक्तेश्वर, भवभूति व जगन्नाथ या कवींनी आपल्या कवित्वाची जाणीव अनेक वेळां प्रकट केली आहे. या जाणिवेंतून स्वतः पटवर्धन तरी सुटले होते काय ? या साऱ्यांची वृत्ति रोगट होती असें म्हणतां येअील काय ? आपण कवि आहोंत या अेका विचाराखेरीज त्यांना दुसरें कांहीच सुचत नव्हतें, त्यामुळे व्यवहारांत किंवा लेखनांत त्यांच्याकडून नेहमी भलतेंच वर्तन होत असे. आपल्या कवित्वाच्या गर्वांत अितरांबद्दल अत्यंत तुच्छता किंवा बेपर्वाअी, किंवा औद्धत्य वा दर्प त्यांच्याकडून प्रकट होअी अित्यादि गोष्टी त्यांच्याबाबत सिद्ध झाल्या तर अेक वेळ त्यांची वृत्ति रोगट झाली होती असें म्हणतां आलें असतें. केशवसुतांनी सर्वसामान्य कवींविषयी बोलताना अतिशयोक्तिपूर्ण अुज्ज्वल शब्दांची योजना केली असली तरी स्वतःच्या कवित्वाचा प्रश्न येअी तेव्हा त्यांची वृत्ति विनीतपणाचीच असे. 'दुर्मुखलेला' या कवितेंतील अभिनिवेश केवळ प्रतिक्रियात्मक होता हें विसरतां येत नाहीं. सारांश, अेखाद्या गोष्टीचा विशेष नाद असणें, आणि वृत्ति रोगट असणें या दोन गोष्टींमध्ये आपण फरक केला पाहिजे. तसें न केल्यास कोणाहि आस्थेवाअीक मनुष्याविषयी प्रस्तुत विधान करणें शक्य होअील.

४. स्त्रीला अुद्देशून प्रेमगीतें लिहिण्याअैवजीं कवितेला अुद्देशून तीं लिहिणें हेंहि या रोगट वृत्तीचें लक्षण आहे असें पटवर्धन समजतात व श्री. माडखोलकर त्याला दुजोरा देतात. अशा अेकंदर पांच कवितांचा श्री. पटवर्धन अुल्लेख करितात. कवितामूलक वृत्तिवैपरीत्य सिद्ध करण्याला मुख्य आधार 'हरपलें श्रेय' या कवितेचा. ती कवित्वशक्तीस किंवा स्फूर्तीस अुद्देशून नसून तिचा अुगम वर्ड्‌सवर्थ कवीच्या Ode on the Intimations of Immortality या कवितेमधील विचारसरणींत आहे. केशवसुतांची वृत्ति या वेळीं अगदी भग्न झाली होती असें समजूनहि तिचें कारण काव्यमोहिनी हें नसून वेगळेंच असावें असें म्हणतां येतें. बाल्यांतील मुग्ध निरागसवृत्ति हें तें हरपलें श्रेय होय, पण पटवर्धन त्या कवितेचा अर्थ चुकीने काव्यविषयक घेतात, व ही जी केशवसुतांची

शेवटची वृत्ति ती आधीच्या प्रवृत्तींचें पर्यवसान होती हें दाखविण्याकरिता पूर्वीच्या चार कवितांचा आधार घेअून विवेचन करितात. त्या कवितांपैकी पहिली 'थकलेल्या मटकणाऱ्याचें गाणें' ही कविता कवितासुंदरीस अुद्देशून आहे असें त्यांनाच निश्चयाने सांगवत नाही. वस्तुतः तें अेक अुत्कट प्रेमगीत असून त्यांत अेकहि शब्द असा नाही की त्याचा अर्थ कवितेकडे घ्यावयास हवा. अितर तीन कविता 'रुष्ट सुंदरीस', 'फिर्याद', आणि 'वियोगामुळे' या काव्यदेवतेस अुद्देशून आहेत यांत 'तिळप्राय संदेह' पटवर्धनांना वाटत नाही. 'रुष्ट सुंदरीस' ही कविता मधळ्यांतील अर्थसादृश्यामुळे Keats कवीच्या "La Belle Dame sans Merci" या कवितेचें रूपांतर वाटतें असें पटवर्धनच प्रश्नचिह्न घालून सुचवितात. अेका चांगल्या वाटलेल्या कवितेचें रूपान्तर करण्याच्या अिच्छेपेक्षा ती अधिक कांही सुचवीत नाही. अुरलेल्या दोन कवितांत 'वियोगामुळे' या कवितेची स्थिति 'थकलेल्या म० गाणें' या कवितेंसारखीच आहे. शेक्सपीरियन् सुनीताप्रमाणेच त्या धर्तीवर लिहिलेलें हें अेक प्रेमविषयक सुनीतच आहे. त्यांतील कोणत्याहि शब्दाचा वाच्यार्थ बाधित होअून लक्षणेने कवितादेवी हा विषय घ्यावा लागतो असें नाही. 'फिर्याद' ही कविता त्यांतील अेका प्रसंगाने लाक्षणिक अर्थाने घ्यावी लागेल. या दोनहि कवितांविषयी पटवर्धन लिहितात:—"त्यांतील अुद्दिष्ट व्यक्ति जरी कवितासुंदरी असली, तरी विषयदृष्ट्या त्यांचा समावेश प्रणयविषयक गीतांत करावयास प्रत्यवाय नाही." (पृ.१५७ अ. वा. से.) या वाक्याचा अर्थ स्पष्ट नाही. या कविता काव्यविषयक तरी समजाव्या, किंवा प्रणयविषयक तरी समजाव्या. फार झाल्यास काव्यदेवतेवर प्रीतीचें रूपक करून लिहिल्या आहेत असें म्हणावें. वस्तुतः केशवसुतांनी लिहिलेल्या अेकदोन कवितांपेक्षा अधिक कविता काव्यदेवतेस अुद्देशून नाहीत. व त्यांतील अेक Keats च्या कवितेवरून सुचली व स्वतःच्या स्फूर्तीने लिहिलेली अेकच आहे. या अेका कवितेवर (किंवा दोन कवितांवर) अुभारलेला आक्षेप टिकण्याजोगा नाही.

५. तसेंच केशवसुतांनी अितर विषयांवर ज्याप्रमाणे रूपक पद्धतीच्या कविता लिहिल्या आहेत तशा अेकदोन कविता काव्यशक्तीविषयी लिहिल्याबरोबर स्वाभाविक अशा स्त्रीप्रेमास त्यांची वृत्ति प्रतिकूल झाली हा निष्कर्षहि अयोग्य होअील. पत्नीप्रेम सोडून काव्यदेवता केशवसुतांना अधिक प्रिय झाली होती हें सिद्ध करण्यास 'कर्तव्य आणि प्रीति' या कवितेचा आधार घेअून पटवर्धनांनी बरीच खटपट केली आहे. ते म्हणतातः—"या कवितेंत प्रियेच्या प्रेमळ संगतीहून काव्यप्रसू विजनवसति अधिक प्रिय झालेली दिसते. प्रिया आणि तिच्या प्रेमाने भरलेलें गृह हें सोडून कवि नदीच्या तीरावर सहल करावयास जातो !... हा गृहत्याग कशासाठी ?" अित्यादि. पटवर्धनांनी कवितेंतील वाक्यांचा मोठ्या कौशल्याने अुपयोग करून घेतला आहे. पण ही सारी हातचलाखी आहे, हें ही कविता समग्र वाचणाऱ्यांना सहज कळून येण्याजोगें आहे. या कवितेंत काव्यरचना हा अगदीच गौण विषय आहे. कवि सहल करण्याकरिता नदीच्या तीराने गेला असतां कांही फुलें त्याने गोळा करून त्यांची वेणी बनविली व ती घरीं आणून मोठ्या प्रेमाने त्याने भार्येस अर्पण केली, व तिला म्हटलें की मोठ्या प्रीतीने अर्पण केलेली ही वेणी कर्तव्यबुद्धीने करण्यांत येणाऱ्या सोन्याच्या अलंकारापेक्षाहि अधिक मोलाची आहे. कर्तव्य म्हणून केलेल्या स्त्रीविषयक कार्यापेक्षा, प्रेमाने पण अपेक्षा नसतां केलेल्या क्षुल्लक गोष्टींनाहि अधिक महत्त्व आहे हा या कवितेचा खरा मुद्दा. तो सजविण्याकरिता केशवसुतांनी अितर गोष्टी त्यांत घातल्या. त्यांत घरांतून बाहेर निसर्गशोभा पाहण्याकरिता गेल्याचा व निसर्गसंगतींत काव्य सुचत असल्याचा अुल्लेख केला, तो अर्थात् गौण आहे. त्याला गृहत्याग अेवढा शब्द कशास हवा ? त्याच कवितेंत कवि घरीं प्रियेला घेअून बसत असल्याचा, बाहेर जाअून काव्य न करितां फुलांची वेणीच करून घेअून येत असल्याचा, ती वेणी मोठ्या प्रेमाने तिला अर्पण करीत असल्याचा, व आपली दोघांची प्रीति प्रबल असल्याचा असे अनेक अुल्लेख आहेत. त्यांच्याकडे दुर्लक्ष्य करून या कवितेचा निष्कर्ष प्रियेपेक्षा काव्यदेवता अधिक आवडूं लागली

होती असा काढणें यालाच काव्याकडे पाहण्याची विकृत वृत्ति म्हणावें लागेल. पत्नीप्रेम, काव्यप्रेम व निसर्गप्रेम यांत खरोखर विरोध नाही. कवि हा मुलांनी आणि पत्नीप्रेमाने भरलेल्या गृहांत राहूनहि कांही काल निसर्गप्रेमाने घरांतून बाहेर पडूं शकतो. त्याप्रमाणे पत्नीवर प्रेम असूनहि कवितेवर प्रेम करूं शकतो. तिच्यावर स्त्रीचें रूपक केल्याने लगेच कांही गुन्हा होत नाही किंवा पहिली पत्नी नावडती होऊन दुसरीकडे लक्ष लागलें आहे असें होत नाही. वस्तुतः या कवितेचा अर्थ स्वतः कवीकडे अितका घेणें योग्य होअील की नाही याचीच शंका आहे. त्यांतून अुगाच मधल्या ओळी घेऊन सबंध संदर्भाकडे किंवा निष्कर्षाकडे दुर्लक्ष करणें हें अयोग्य. तात्पर्य, कवितेवरच प्रेम करण्याच्या व त्यामुळे वृत्ति रोगट होती असें ठरविण्याच्या या प्रयत्नाचा डोलारा अत्यंत डळमळीत असून तो उभारण्याच्याहि लायकीचा नाही.

६. प्रत्यक्ष सृष्टीपासून अलग राहण्याच्या वृत्तीसंबंधाने हीच स्थिति आहे. केशवसुतांनी म्हटलें आहे— 'अस्मदीय हृदयीं ठरलें—की जग हें दुःखें भरलें ॥' किंवा 'कठिण जगीं बघती या छिद्र काक सारे। करुणेचें कोठेंही लेश नसे वारें ॥ अित्यादि. असे नैराश्याच्या विचारांचे क्षण बहुतेक कवींच्या मनांत येतात, व सामान्य व्यावहारिक जगांत न राहतां दूर जावें असें त्यांना मधून मधून वाटतेंच. 'कांहीहि करा ही जनता मारिल नांगी। हासून अपांगीं ॥" (मा. जूलियन) असें त्यांना वाटतें, व म्हणून मग "कोठेतरि जाऊं बसुनी शीघ्र विमानीं। अज्ञात ठिकाणीं ॥ स्वातंत्र्य जिथे, शांति जिथे, प्रेम अिमानी। तेथे चल राणी ॥" असें ते म्हणतात (मा.जू.). कोणी हतभागी कवि मेला तर 'गेला कवीश्वर अता, सुटला बिचारा' असेहि अुद्‌गार त्यांच्या तोंडून निघतात. (मा.जू.). कवींनाच काय, पण साऱ्याच लोकांना तसें मधून मधून वाटतें. कवि जरा अधिक हळवे असतात व आपल्या भावना पद्यांत ग्रथित करूं शकतात अितकेंच. पण त्यांनी असें केल्यावर लगेच ते रोगट वृत्तीचे बनतात असें अनुमान करणें अविचारीपणाचें होअील. जी स्थिति बहुतेक विचारवंतांची मधून मधून होते, ती कवीची झाली तर त्यांत अस्वाभाविक कांही नाही. केशवसुतांचे नैराश्याचे अुद्‌गार तेवढे घ्यावयाचे, आणि अितर अुद्‌गारांकडे दुर्लक्ष करावयाचें ही आपल्या सोअीचें तेवढें पाहण्याची वृत्ति बरोबर नव्हे. जगापासून आपण वेगळेंच राहावें ही केशवसुतांची कायमची वृत्ति असती तर 'झटणें हें या जगण्याचें। तत्त्व मनीं तूं जाण' किंवा 'संसारा मी समर गणीं' किंवा 'बोल लाविती देवास। त्यास म्हणावें का पुरुष; कर्तव्याला देअी पाठ। तो चाले नरकाची वाट' असे विचार त्यांनी वेळोवेळीं प्रकट केले नसते. 'जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत' असें ज्याला वाटतें; लहान मोठें, साधु-अधम, दूर-जवळ हीं द्वंद्वें ज्याला अुरलीं नाहीत त्याला जगाचा कंटाळा आला होता असें कसें म्हणतां येअील ? जगांतील आळशी, पोकळ बडबड करणारे गुलामी वृत्तीचे, स्वार्थी व भेकड असे जे लोक त्यांच्याशीं वैराची गांठ मारलेली गोफण घेऊन कठिण शब्दांच्या धोंड्यांनी हाणाहाण करण्याची ज्याची शेवटीं शेवटींहि तयारी होती त्यांचें मन जगाला विटून रोगट झालें होतें असें कसें म्हणतां येअील ? केशवसुतांनी लिहिलेल्या अितर ओळींचा आधार घेऊन त्यांच्यावर आक्षेप घेणाऱ्यांनी त्यांच्या "जें रम्य तें बघुनिया मज वेड लागे। गाणें मनांत मग होय सवेंच जागें" या ओळींकडे दुर्लक्ष कां करावें ? गाणें सुचणें आणि 'रम्य' वस्तु पाहून सुचणें यासारखी मनाची निरोगी अवस्था दुसरी कोणतीहि नसेल.

७. केशवसुतांच्या कवितेवर पटवर्धनांचा दुसरा महत्त्वाचा आक्षेप असा की ती **क्लृप्तिप्रधान** आहे. या आक्षेपाचा अर्थ लक्षांत येण्यास 'क्लृप्ति' शब्दाचा अर्थ स्पष्ट व्हावयास हवा. स्वतः केशवसुतांनी 'क्लृप्ति' हा शब्द आपल्या काव्यांत योजिला आहे. 'चिह्नीकरण' या कवितेंत काव्यनिष्पत्तिप्रक्रियेचें वर्णन करीत असतां भावना (भाव) आणि शब्द (मूर्ति) यांच्या विवाहाने 'सरस क्लृप्ति आणि विचार' हीं बालकें जन्मास येतात असें ते म्हणतात (के. कविता, पृ.१४१). 'काव्य कोणाचें' या दुसऱ्या काव्यविषयक कवितेंतहि 'क्लृप्ति आढळली सरस अेक त्याला' असा शब्द-

प्रयोग त्यांनी केला आहे. 'सृष्टि आणि कवि' या तिसऱ्या अेका कवितेंत 'सत्क्लृप्तिपूरित असें सदनास येतें' अशी काव्यासंबंधी भाषा योजिली आहे. 'वियोगामुळे' या प्रेमविषयक सुनीतांत 'जा मत्क्लृप्ति तुझ्याविशीं' असे शब्द आले आहेत. या साऱ्या ठिकाणीं केशवसुतांना अभिप्रेत असा त्या शब्दाचा अर्थ म्हणजे केवळ कल्पना असा आहे. सरसक्लृप्ति म्हणजे सुंदर कल्पना अेवढाच अर्थ त्यांना अिष्ट आहे. परंतु पटवर्धन जेव्हा केशवसुतांचें काव्य क्लृप्तिप्रधान आहे असें म्हणतात त्या वेळीं त्यांच्या मनांत त्या शब्दास आधुनिक मराठींत झालेला 'चमत्कृति' अर्थ अभिप्रेत आहे असें वाटतें. 'केशवसुत वर्णनांतील जिवंत हुबेहुबपणाची अुणीव क्लृप्तीने भरून काढतात' असें पटवर्धनांचें म्हणणें आहे (अ. वा. सेवक, पृ.१३४). येथे क्लृप्ति म्हणजे अर्थचमत्कृति असा त्यांचा आशय दिसतो. चमत्कृति शब्दहि पटवर्धन क्लृप्ति या शब्दाबरोबर किंवा त्या अर्थाने अनेक वेळां योजितात. 'हा बुद्धिविलास चमत्कृतिजनक असतो (अ.वा.सेवक, पृ.१३६), 'म्हातारी ही कविता जितकी चमत्कृतिजनक आहे तितकी हृदयस्पर्शी नाही' (सदर पृ.१३८). 'चमत्कृतिजनक कष्टसिद्ध क्लृप्ति' (सदर पृ.१५१-५४), 'क्लृप्तिप्रसू मनोराज्य' (सदर पृ.१५७) अित्यादि स्थलीं पटवर्धनांना क्लृप्तीचा अर्थ 'अर्थचमत्कृति असा अभिप्रेत आहे. क्लृप्तिप्रधानत्वाचा हा आक्षेप पटवर्धनांना केशवसुतांच्या सर्वच कवितेवर स्थूलमानाने घ्यावयाचा आहे. ते म्हणतात:— ज्यांत क्लिष्ट चमत्कृतिजनक क्लृप्ति नाही, तर भावनेची सरळ, रसाळ व हृदयंगम अभिव्यक्ति आहे अशीं स्थळें केशवसुतांच्यां कवितेंत फार सांपडत नाहीत (अ.वा.से. पृ.१५१) या आक्षेपाचा अर्थ असा:— काव्यांत भावनेला म्हणजे रसाला प्राधान्य हवें; अर्थचमत्कृति म्हणजे बुद्धिविलास होय, व त्यांत भावनेला अडथळाच होतो (अ. वा. से. पृ.१५१). म्हणजे केशवसुतांच्या काव्यांत भावना म्हणजे काव्य कमी होतें. बुद्धिविलासच अधिक. हाहि सहज असा नसे. कारण पटवर्धनांनी त्याला क्लिष्ट आणि कष्टसिद्ध अशीं विशेषणें लाविलीं आहेत (अ. वा. से. पृ.१५१, १५४, १७३, १३९, १३८) म्हणजे भावना विरल असली तरी बुद्धिविलास तरी चपल आणि प्रसादपूर्ण हवा. पण तोहि तसा नसल्याने केशवसुतांच्या कवितेमधील काव्य कमी झालें आहे.

८. आक्षेपाचें स्वरूप अधिक स्पष्ट व्हावयास 'अर्थचमत्कृति' या शब्दाचा अर्थ अधिक स्पष्ट व्हावयास हवा. आपला अभिप्राय कवीने साध्या, सरळ शब्दांनी प्रकट केल्यास त्यांत चमत्कृति येत नाही. साध्या, सरळ शब्दांपेक्षा अितर कोणत्याहि मार्गांनी तो व्यक्त झाल्यास त्यांत चमत्कृति येते. या दृष्टीने सर्वच अर्थालंकार, स्वभावोक्ति सोडून, हे अर्थचमत्कृतीचीं अुदाहरणें होत. अुपमा, रूपक, अुत्प्रेक्षा हे साधे साम्यमूलक अलंकार, तसेच विरोध, विभावनाअसंगतीसारखे विरोधमूलक अलंकार, किंवा सामान्यमीलितासारखे कृत्रिम साम्यमूलक, किंवा श्लेषसमासोक्तीसारखे अनेकार्थमूलक अलंकार, या साऱ्यांमुळेच अर्थचमत्कृति निर्माण होते. पण साध्या साम्यमूलक अलंकारांतून कल्पनेचा सहजरमणीय विलास अधिक असतो, तर श्लिष्ट व विरोधमूलक अलंकारांमधून बुद्धीचा विलास अधिक असतो. क्लिष्टत्वाची किंवा चमत्कृतिजनकत्वाची तक्रार येते ती या दुसऱ्या प्रकारच्या अलंकृतीविरुद्ध, विशेषतः विरोधमूलक अलंकारांविरुद्ध. अपरिचित कल्पना, अनपेक्षित कलाटणी, अर्थाविरोधाचा आभास, थोड्या विचारान्तीं त्याचा परिहार, दोन दोन अर्थ लावण्याचे परिश्रम अित्यादि गोष्टी त्यांत येतात. अर्थात् त्या मानाने भावनेचें प्रमाण कमी होतें. पटवर्धनांचा आक्षेप आहे तो या गोष्टींविरुद्ध.

९. आक्षेपाचा अर्थ याप्रमाणे विशद झाल्यावर त्यांत तथ्य किती आहे तें पाहणें सुकर होईल. केशवसुतांच्या अनेक कवितांतून विचारास प्राधान्य आहे यांत शंका नाही. 'कल्पकता,' 'रूढि, सृष्टि, कलि,' 'स्वर्ग-पृथ्वी-मनुष्य,' 'सृष्टि, तत्त्व आणि दिव्यदृष्टि', या कविता, किंबहुना, 'आम्ही कोण' अथवा 'प्रतिभा' या कविताहि विचारप्रधान कविता आहेत. पण विचार हा काव्याचा विषय होत नाही असें नाही. केशवसुतांनी आपल्या 'चिह्नीकरण' या कवितेंत सरस क्लृप्तीप्रमाणे

विचारहि काव्याचा विषय होतात हें सांगितलें आहेच. शितरांनाहि केशवसुतांच्या काव्यांतील हा भाग महत्त्वाचा वाटतो. त्यामुळे आधुनिक कवितेंत त्यांची कविता वजनदार ठरली आहे. हे विचार अर्थात् आकर्षकपणें मांडिल्याखेरीज त्यांस काव्यरूप येत नाही. ते सरळ सांगितले तर केवळ गद्य वाटतील, म्हणून त्यांना रूपकाचें स्वरूप द्यावें ही कवींची सर्वमान्य युक्ति आहे. यालाच पटवर्धन मूर्तिकरण म्हणतात. हा रूपकाचा आश्रयहि रम्य व प्रसादपूर्ण असला तर बरें असतें. केशवसुतांच्या बाबत तो पुष्कळ वेळां प्रसादपूर्ण नसे. केशवसुतांचें प्रारंभींचें भाषेवरील अप्रभुत्व, व त्यांना शेवटपर्यंतहि जें फारसें साधलें नव्हतें त्या लालित्याचा अभाव यांमुळे त्यांच्या कित्येक कविता रसाळ अुतरल्या नाहीत हें खरें आहे. भाषेवर प्रभुत्व असणाऱ्या आणि लालित्याची अधिक दृष्टि असणाऱ्या दुसऱ्या अेखाद्या कवीने याच कविता अधिक काव्यमय करून दाखविल्या असत्या. पण तेवढ्याने त्यामध्ये अधिक भावना आली असती असें नाही.-या कवितांतील काव्य विचारांचें गौरव आणि अभिव्यक्ति-मधील आकर्षकता यांतच असतें. केशवसुतांच्या या प्रकारच्या कवितांत अभिव्यक्तीची आकर्षकता किंवा परिणामकारकता कमी असली तरी त्यामुळे त्यातील विचारांचें महत्त्व कमी ठरत नाही. त्यांतील क्लिष्टत्वहि कित्येक वेळां भाषेचें आहे, विचारांचें नाही. जेथे भावनेस महत्त्व आहे तेथे क्लिष्ट कल्पना किंवा अर्थचमत्कृति येतां कामा नये हें कोणासहि मान्य होअील. पण जेथे विचारालाच प्राधान्य आहे, तेथे भावना कमी आहे अशी तक्रार काव्यविषयक अेकान्तिक कल्पनेची द्योतक होअील. समकालीन बहुतेक कवींच्या कवितेपेक्षा केशवसुतांची कविता अधिक विचारप्रधान होती, व ती तशी होती म्हणूनच अधिक महत्त्वाची ठरली यांत मतभेदाला वाव असेल असें वाटत नाही.

१०. पण प्रस्तुत आक्षेप केशवसुतांच्या कवितेच्या कांही भागासंबंधी युक्त वाटला तरी, तो जेव्हा सरसकट त्यांच्या सर्वच कवितेवर घेण्यांत येतो तेव्हा खरी चूक होते. "भावनेची सरळ, रसाळ हृदयंगम अभिव्यक्ति आहे अशीं स्थळें केशवसुतांच्या काव्यांत फार सांपडत नाहीत" हें पटवर्धनांचें विधान अशा स्वरूपाचें आहे. 'फार व थोडें' या कल्पना सापेक्ष असतात, परंतु प्रस्तुत विधानाचा रोख अशीं स्थळें फारच थोडीं म्हणजे अपवादात्मक आहेत असें सांगण्याचा दिसतो. वस्तुस्थिति तशी असावी असें वाटत नाही. तुतारी, स्फूर्ति, नवा शिपाई, गोफण, दोन बाजी अित्यादि ओजो-गुणयुक्त अुत्साहभावना व्यक्त करणाऱ्या त्यांच्या कविता, त्याचप्रमाणे आअीकरितां शोक, वातचक्र, सिंहावलोकन, नैर्ऋत्येकडील वारा, भृंग, पुष्पाप्रत या शोक वा नैराश्य प्रकट करणाऱ्या कविता, किंवा 'थकलेल्या मटकणाऱ्याचें गाणें' व 'फारा दिवसांनी भेट' इत्यादि प्रेमविषयक कविता पाहिल्या की पटवर्धनांचें हें विधान 'फारच अतिशयोक्तिपूर्ण' म्हणावें लागेल. वर अुल्लेखिलेल्या कविता या अनेकांपैकी कांही आहेत हें लक्षांत घ्यावें. अशा साऱ्याचं कवितांचा अुल्लेख येथे करणें शक्य नाही व आवश्यकहि नाही. आरंभींच्या प्रेमविषयक कवितांतून केशवसुतांनी अर्थचमत्कृति आणली आहे हें मान्य करणें जरूर आहे. अुदाहरणार्थः— 'प्रियेचें ध्यान,' 'जरी तूं ह्या येथे' या कविता दाखवितां येतील. परंतु केशवसुतांच्या आरंभींच्या किंवा अेकंदरींत साऱ्याच प्रेमकाव्यांत आधुनिक कवींचा जिव्हाळा अपेक्षिणें चूक आहे. त्यांच्या प्रेमकल्पना बऱ्याच प्रमाणांत अिंग्रजी काव्य वाचूनच बनलेल्या व केवळ बुद्धीने आकलित अशा स्वरूपाच्या असणें स्वाभाविक होतें. त्यामुळे भावनेपेक्षा बुद्धि-विलासावरच अवलंबून असणें त्यांना भाग होतें. पण साऱ्या प्रेमकाव्यांत आणि इतर प्रकारच्या सर्वच कवितेंत हें झालें असें नाही. भावनाप्राधान्य असलेल्या, निदान सरळ अर्थव्यक्ति होणाऱ्या अशा कविता केशवसुतांच्या काव्यांत पुष्कळच सांपडतील. केवळ अेकदेशापुरता लागू पडणारा आक्षेप सर्वच कवितेस लागू पडणारा आहे असें समजल्यामुळे पटवर्धनांचें वरील विधान दिशाभूल करणारें झालें आहे.

११. आक्षेप नव्हे, पण महत्त्वाचें मत म्हणून ज्याचा अुल्लेख करावयास हवा असें पटवर्धनांचें केशवसुतांविषयींचें मत म्हणजे त्यांच्या क्रांतिकारकत्वाविषयींचें. केशवसुतकालीं मराठी काव्यांत क्रांति

झाली ही गोष्ट त्यांना मान्य आहे; मात्र केशवसुतांनी ती आणण्याकरिता विशेष कांही केलें असें त्यांना वाटत नाही. होऊं घातलेल्या क्रांतींत सांपडलेले, पण तीकरिता स्वतः कांही न केलेले, असे कवि ते होते असें त्यांचें मत आहे. काव्यांतील क्रांति आपोआप होत नाही. ती करण्यास कोणा कवीचें किंवा कवींचें काव्य कारणीभूत होतें. वसंतऋतूंत आपोआप पालवी व फुलें येऊं लागतात तशी आपोआप नवीन कविता फुलते असें नाही. नवीन कविता कोणीं लिहावी लागते, तींत रचनेच्या दृष्टीने व विषयाच्या दृष्टीनेहि कोणीं कांही नवीन करावें लागतें. तें केशवसुतांनी केलें नसेल तर अितर कोणीं केलें हें सांगावयास हवें. केशवसुत जर या नवीन क्रांतींत केवळ सांपडलेले कवि, तर अितर सारेच तसे सांपडलेले ठरतील, व क्रांति कविनिरपेक्ष झाली असें म्हणावें लागेल. मराठी कवितेला नवीन अिंग्रजी वळण लागणें ही जर ती क्रांति असेल तर ती करण्याचा व जाणीवेने करण्याचा प्रयत्न केशवसुतांच्या अितका कोणीं केलेला नाही. काव्यक्रांति ही कोणी देवी म्हटलें आणि कवि हे केवळ तिचे गण म्हटले तरी केशवसुत हे तिचे सर्वांत आवडते गण म्हणावे लागतील. आधुनिक कवितेंत केशवसुतांचें स्थान पहिलें आहे असें पटवर्धन म्हणतात त्याचा अर्थ हाच होय. पण केशवसुतांनी मराठी कवितेला नवीन वळण लावण्याकरितां कांही केलें नाही ही गोष्टहि मान्य होण्याजोगी नाही. केवळ बाह्यरूप घेतलें तर तें बदलण्यासहि त्यांनी जाणीवेने प्रयत्न केले व पुढील कवींनी ते मान्य केले. अर्थात् क्रांति झाली नसून अुत्क्रांतिच झाली असें म्हणणाऱ्यांचें मत केशवसुतांना अितकेंहि अनुकूल राहणार नाही. पटवर्धनांना क्रांति झाली हें मान्य, पण तींत केशवसुतांचा माग अमान्य यामुळेच अडचण अुपस्थित होते.

१२. केशवसुत 'शब्दांना फारच महत्त्व देत होते' असें अेक विधान डॉ. पटवर्धनांनी विवेचनाच्या ओघांत केलें आहे. त्याचा स्पष्ट अर्थ आक्षेपरूप होतो की नाही तें संदिग्ध आहे. अर्थापेक्षा शब्दाला महत्त्व देणारे कवि अर्थात् खालच्या वर्गातील म्हणावे लागतात. असें कांही पटवर्धनांस सुचवावयाचें होतें हें स्पष्ट झालेलें नाही. केशवसुतांचें शब्दप्रभुत्व अितर अनेक कवींच्यापेक्षा कमी होतें ही गोष्ट सर्वपरिचित आहे. त्यांना शब्दांचें महत्त्व वाटावें हें साहजिक आहे. 'शब्दांनो मागुते या' असें ते म्हणतात् तें यामुळेच. पण अर्थाला बाजूस टाकून शब्दालाच त्यांनी महत्त्व दिलें असें नाही. अुलट शब्दयोजनेबाबत त्यांनी अधिक सूक्ष्मरुचित्व दाखविलें असतें तर बरें झालें असतें असें वाटतें. शब्दाचा म्हणजे त्याच्या नादमाधुर्याचा मोह होअून केवळ कानाला बरा वाटणारा शब्द त्यांनी योजिला आहे व त्यामुळे निरर्थकत्व किंवा अनर्थकत्व पत्करलें आहे असें झालेलें नाही. शब्दसौष्ठवाकरिता अर्थहानि त्यांनी पत्करिली नाही. अुलट शब्दयोजनेंत लालित्याचा किंवा नादमाधुर्याचा अभाव असल्याचीं अुदाहरणेंच अधिक सांपडतील. या आक्षेपाला पटवर्धनांनी स्पष्ट अभिव्यक्ति दिली नसल्याने यापेक्षा अधिक चर्चा येथे करितां येत नाही. पण प्रधान गोष्टीला महत्त्व न देतां गौण गोष्टींनाच केशवसुत काव्यांत महत्त्व देत होते असा त्यांच्या काव्याभिरुचीविषयी गैरसमज वरील विधानाने होण्याचा संभव आहे याकरिता हा विस्तार करावा लागला.

केशवसुतांवरील पटवर्धनांच्या लेखांतील महत्त्वाचे आक्षेप हेच होत. याशिवाय बारीक मतभेदाचीं स्थळें आणखी निघतीलहि. तथापि तीं महत्त्वाचीं नसल्याने त्यांची चर्चा येथे करण्याची आवश्यकता नाही.*

---

* लेखकाच्या केशवसुतांवरील आगामी ग्रंथांतून.

# याने मराठीच्या व्युत्पत्तीस काय अुपकार होणार ?



गो. कृ. मोडक

साहित्य-पत्रिका अंक ७० मध्ये प्रा. कृ. पां. कुळकर्णी यांनी सुमारें ७० शब्द चर्चिले आहेत. यांत त्यांनी मराठी शब्दांच्या पुढे ऑस्ट्रिक, चिनी, मुंडा अित्यादि भाषांतील थोड्याबहुत अंशाने सदृशाकार असे शब्द प्रभव किंवा मूळ म्हणून दिले आहेत. या शब्दांत आकाराबरोबर अर्थाचेंहि साम्य कांही आढळतें. अशा साम्यावरून ते सुचवितात– "हे शब्द आर्यभाषांनी ऑस्ट्रिक अित्यादि भाषांतून घेतले असावे." (पृ.१००) त्यांच्या चर्चेत शब्दांचें जन्य जनक असें नातें संभवण्यास अवश्य असणाऱ्या गोष्टी फारच थोड्या आहेत. यामुळे वरील अनुमान मनास पटत नाही. अुलट पुढील चर्चेवरून दिसून येअील की ऑस्ट्रिक अित्यादि भाषांतील शब्द आर्य शब्दांचे जनक नसून, वस्तुतः त्यांचे जन्यच आहेत. अेतदर्थ येथे पुढील प्रकार विचारार्ह आहे.

विद्वानांस हें संमत होअील की अिंग्रज व यवन यांनी आपणांवर आधिपत्य मिळवून आपणांस अनेक गोष्टींत हीन ठरविलें. याचा परिणाम असा झाला की अितर गोष्टींबरोबर त्यांच्या भाषांतील पुष्कळच शब्द आपण अुपयोजितों,— कांही अपरिहार्य, कांही परिहार्य असूनहि. याच्या अुलट अिंग्रज व यवन यांच्या भाषांत आपले शब्द तुलनया फारच थोडे गेले आहेत. या दोन्ही गोष्टींच्या मुळाशीं त्यांच्या संस्कृतीचें अुच्चत्व, विशेषतः कांही बाबतींमधील तरी, कारण आहे. यावरून स्पष्ट ठरतें की जेते लोक अुच्च संस्कृतीचे असल्यास, व तसे ते कांही बाबतींत तरी असणारच, त्यांच्या भाषेंतील शब्द जितांच्या भाषेंत शेकड्यांनी येतात. या दृष्टीने ऑस्ट्रिक शब्दांकडे पाहिल्यास काय दिसावें ? ऑस्ट्रिक लोकांचे जेते द्राविड व या दोघांचे जेते आपण आर्य. आपली संस्कृति ऑस्ट्रिक संस्कृतीहून वरिष्ठ हें विवाद्य नाही. तेव्हा अशा स्थितींत शब्दांची देव संस्कृताने वा प्राकृताने केली, आणि घेव ऑस्ट्रिक अित्यादि भाषांनी केली, असाच निष्कर्ष निघत नाही काय ? अर्थात् जो शब्द संशयित मुळाचा भासेल तो आर्यांपासूनच ऑस्ट्रिकांनी घेतला असेंच अनुमान प्राप्त होतें. असें असतां श्री. कुळकर्णी, वर्णतः अत्यंत अपुरें, मोडकेंतोडकें साम्य दाखवून हे शब्द संस्कृतानेच दत्तक घेतले असें विद्वानांचें मत म्हणून सांगतात. विशेषतः खाटें, वांगें, शेवट, शेळी, लुणें हे शब्द माझ्या मताने ऑस्ट्रिक असूंच शकत नाहीत, ही गोष्ट पुढील निवडक शब्दांच्या चर्चेवरून दिसून येअील.

१ आलें < आर्द्रक. आर्द्र = ओलें. सुंठीपासून आलें आर्द्रपणाने म्हणजे ओलेपणानेच निराळें आहे. तेव्हा आर्द्र हें मूळ ग्राह्य ठरतें. याशीं सगोत्र पुढील शब्द येथे अुपकारक होतील— लातिन– Hydra, ग्रीक– Hudra, संस्कृत अुद्र = चलचर प्राणी. लातिन– uhda, ग्रीक– hudor, सं. अुदन् = पाणी. पाणी हें आलेंपणास कारण असतें हें सांगणें नकोच. तेव्हा आलें याचा प्रभव म्हणून अल्य, हलिय या शब्दांचें ऋण मानणें युक्त नाही. अुष्ट्र हा शब्द याच रूपाने ऑस्ट्रिकहि आहे. संस्कृतांत त्याची व्युत्पत्ति अुष् + त्रै अशी आहे. अुष् = अुष्णता. त्रै = रक्षणें. अुषि त्रायते सः अुष्ट्रः. तापलेल्या रखरखीत वाळवंटांतून मनुष्यास जो वाहून सुरक्षित नेतो तो अुष्ट्र. फारसी भाषेंतहि अुश्तर असा अेतत्सदृशाकार शब्द आहे. समासान्तीं 'राखणारा' या अर्थी 'त्र' चा अुपयोग पवि–त्र (= इंद्र, पवीने म्हणजे वज्राने रक्षण करणारा) या समासांत आहे. येथे संस्कृत, फारसी व ऑस्ट्रिक या तीनहि भाषांना सामान्य, व संस्कृतांत व्युत्पन्न असणारा शब्द मूळ कोणत्या भाषेंतील असावा हें विद्वानांनी ठरवावें. केर— 'कच्चरं मलदूषितम्' या अमरवचनाप्रमाणे कच्चर या

मूळांत पहिल्या दोन अक्षरांत अ हा स्वर आहे. अशा अक्षरांच्या ठिकाणीं कधी कधी मराठींत, व संस्कृतांतहि, अे येतो. उदा० कदली- मराठी केळ, जर्जर- मराठी जेर, छगण- शेण, शतं- शे. संस्कृत- जजरतुः, जेरतुः; तव- ते; मम- मे. यावरून केर हा शब्द संस्कृताचा तद्भव ठरतो. **टाळकें** हा शब्द तालु (तोंडांतील टाळा) यावरून आला आहे. संस्कृत तालु आणि मराठी टाळकें या दोन शब्दांनी तोंडाच्या आंतील व बाहेरील भाग, परस्परांच्या खालीवर असलेले, दर्शविले जातात. टाळकें याचें मूळ संस्कृतेतर ऑस्ट्रिक मानण्याचें कारण नाही. श्री. कुळकर्णी यांनी या शब्दाचा ऑस्ट्रिकवरून केलेला अुलगडा समजणें कठिण आहे. तो असा:— "टाळकें ह्या मराठी शब्दाचा अर्थ 'कपाळाची कवटी' असा आहे. ऑस्ट्रिक शब्द कल्का, कल्काकुअि, तलके = खिळा असे आहेत." **मनुष्य**— अेतदर्थ शब्द प्रायः सदृश रूपाने अनेक भाषांत आढळतात. त्यांचें मूळ मन् (विचार करणें) असें बहुमत आहे. तथापि श्री. कुळकर्णी हा शब्द मेनिक्, मेनिट् अित्यादि शब्दांशीं संबद्ध मानितात. संबंध मान्य करावयास प्रत्यवाय नाही; तथापि भेद अेवढाच की मनुष्य > मेनिक् झाला. मशक<मश् (घुंघुं आवाज करणें). याशीं सदृश धातु मक्ष्- समुदायाने राहणें असाहि आहे. मक्षपासून मक्षिका- माशी. मच्छर हा शब्द यांचाच नातलग होय. लातिन शब्द Musca माशी असा आहे. अशा रीतीने मशक अित्यादि शब्द युरोपांतील व आशियांतील आर्य अेकत्र राहत होते त्या वेळीं बनलेले आहेत. आशियांतील आर्यांनी द्राविड किंवा ऑस्ट्रिक लोकांपासून हे शब्द घेतले असते तर ते पूर्वकालींच संसृष्ट अशा लातिन भाषेंत कसे सांपडते ! अशा स्थितींत मुस्, मोअि अि० मुळें श्री. कुळकर्णी कशीं पसंत करतात?

२ **मिशी**— ग्रीक Musta = तोंड, यावरून मुस्टाश हा मिशीवाचक शब्द अिंग्रजींत साधितात. संस्कृतांत श्मन् = तोंड, यावरून स्वरविकाराने श्मश्रु व्युत्पादितात. हेंच मिशीचें मूळ होय. ग्रीक्मध्ये याचा नातेवाअीक शब्द असल्याने हा शब्द कुळकर्णी सुचवितात त्याप्रमाणे ऑस्ट्रिक "मिसेअि, मिसअी" अित्यादि शब्दांपासून संभवत नाही. **सबंद्**<सबंध. गवताची पेंढी पिळलेल्या गवताच्या बंदासह गुराने खाल्ली म्हणजे आपण म्हणतों त्याने सबंध (सगळी) पेंढी खाल्ली. या व्यवहारांत 'सबंध'ला चिकटलेला पूर्ण हा अर्थ प्रचारांत सार्वत्रिक झाला आहे. **साल**<छल्ली. यांत छद् = झांकणें. झाडाचें खोड सालीने वेष्टिलेलें असतेंच. श्री. कुळकर्णी यांनी सबंध याचें मूळ ऑस्ट्रिक सबेंदा, व साल या शब्दाचें चेलॉक असें सुचविलें आहे. मला वाटतें ऑस्ट्रिक् अि० लोकांनीच हीं मुळें संस्कृत शब्दांपासून घेतलीं असावीं. संस्कृताप्रमाणे ऑस्ट्रिक भाषेंतहि हे शब्द व्युत्पन्न आहेत असें दाखविलें गेल्यास मात्र याचा फेरविचार करतां येअील.

या चर्चिलेल्या शब्दांचीं मुळें संस्कृत आहेत. अितर शब्दांचींहि अशींच दाखवितां येतील. कांहींचे सगोत्र शब्दहि संस्कृतांत प्रचलित आहेत. मूळ संस्कृत आणि हे तद्भव यांमध्ये अर्थ-संगतीहि आहे. तेव्हा यांच्या आर्यमूलांविषयी शंकेस स्थान नाही. याच दृष्टीने पुढील शब्द विशेषच विचारणीय आहेत.

३ **खाटें** (वरण) यांतील खाटें याचा अर्थ खारट असा कुळकर्णी करितात. खाटें वरण वगळून दुसरें वरण कोणतें ? गोडें वरण. अर्थात् खाटें वरण म्हणजे गोडें नव्हे तें. या गोड्या वरणांत मीठ अवश्य घालतात. गोड-च्या अुलट धर्म कोणता ? आंबट किंवा कडू. पैकी येथे आंबट हा अर्थ खाटें-ने विवक्षित आहे. या वरणांत चिंच हा आंबट पदार्थ घालतात, व गोड्या वरणांत तो घालीत नाहीत. खारट अर्थ खाटें-चा संभवत नाही. तो अर्थ खारा<क्षार या शब्दाचा आहे. खारे दाणे आपल्या परिचयाचे आहेतच. खाटें-चा अर्थ आंबट कसा होतो ? फार आंबट पदार्थ खाल्ल्याने दांत शिवळतात, ते आंबतात व त्यांस अपकार होतो. अीडलिंबास **दंतशठ** व चुकाभाजीस **दंत-शठा** असें म्हणतात. हीं दोनहि आंबट असतात. तेव्हा दंतशठ = अंबट. पण प्रचारांत अंबट हा अर्थ शठ (>खट) या अवयवाचा होतो. पूर्ण समासाचा अर्थ त्याच्या अेकाच अवयवाने बोधित

होतो. क्वचित् लुप्ते अपि अवयवे समासार्थो न हीयते (क्वचित् अवयव लोपला तरी समासाचा अर्थ कायमच राहतो). अुदा० अजागलस्तन-चा अर्थ अजागल अेवढ्यानेच बोधित होतो. खट्टाचा अर्थ आंबट असा हिंदीमध्येहि आहे. खाटु (आंबट) असा गुजरातींतहि शब्द आहे. यावरून खाट शब्दाचें मूळ शठ्–अपकार करणें हा धातु सिद्ध होतो. येथे खाटें करण म्हणजे खारट करण असें भ्रमानें समजून कार, चाट अि० मूलभूत मानलेल्या ऑस्ट्रिक शब्दांचा अर्थ खारट असाच लेखक करीत असावे असें वाटतें. तेव्हा अर्थतःहि खाटें-चें मूळ कार, चाट अित्यादि नाही हें अुघड होतें.

४ वांगें <वृन्ताक <वृन्त + अक्– वाकडेंतिकडें हालणें + अ. वृन्त = देठ. वांगें हें फळ मोठें व जाड असल्याने थोड्याहि वाऱ्याने डेखापासून हेलखावे खातें. या गोष्टीस अनुलक्षून या फळास वृन्ताक म्हणतात. मराठी बोलणारास ऋ चा अुच्चार कठिण वाटतो म्हणून त्याचे स्थानीं वारंवार तो आ अुच्चारतो (घृष् > घास). शब्दांतील त वारंवार लोपतो (मातंग > मांग) आणि संस्कृत शब्द मराठींत येतांना वर्गांतील प्रथमाक्षर तृतीय होतें. (मुद् > मोद् > मोड). हे तीन विकार अेकत्र अेअून वृन्ताकचें मराठींत वांगें असें होतें. लेखकाने दिलेलें संस्कृत मूळ वार्तिगण येथे मुळीच संभवत नाही. वृन्ताक = वांगें ही व्युत्पत्ति अवयवशः व अर्थशः सयुक्तिक असल्याने वांगें हा शब्द मूळचा परभाषीय आहे असें मानण्याचें कारण नाही.

५ शेवट— हा शब्द शेप = पुच्छ या शब्दास ट प्रत्यय लागून साधला आहे. याच वेळीं प चा व झाला. हाच विकार दीप–दिवा या जोडींत सांपडतो. या शब्दाचीं मुळें म्हणून लेखक पुढील ऑस्ट्रिक शब्द देतातः— सअेँ, से अंग, सेन्, शेन्, सेनचेन्, चुंग, चाँग. या शब्दांचें 'शेवट'शीं किती साम्य आहे ? शेळी—'अजा छागी शुभच्छागवस्तच्छगलका अजे' (अमरकोश) यांतील पहिले दोन शब्द बकरीचे वाचक आहेत, आणि पुढील बकऱ्याचे वाचक आहेत. यांतील छगलकचें स्त्रीलिंग छगलिका असें होतें. नंतर शेवटल्या अिकाचे स्थानीं केवळ ई येते (जसें छुरिका –सुरी). मागे केर मध्ये पाहिल्याप्रमाणे दोन 'अ'वर्णयुक्त अक्षरें लागोपाठ आल्यास त्यांअैवजीं अेक अेयुक्त अक्षर येतें, या न्यायाने छग = छे झालें. छ आणि श परस्परांबद्दल येतात (छगण = शेण) हे सर्व विकार अेकत्र येअून छगलिका = शेळी. ल–चा ळ वारंवार होतो हें सांगणें नकोच (कुल= कूळ). अशा रीतीने वर्णतः शेळी हा शब्द सप्रमाण तद्भव सिद्ध होतो. यांतील वर्णविकार गणित-शास्त्रांतल्याप्रमाणे सर्वथा नियमबद्ध आहेत. अर्थात् शेळी संस्कृतोद्भव आहे हें संशयातीत ठरतें. ऑस्ट्रिक शब्द छेस्, श्येस, हेस्स यांपासून शेळी शब्द कसा संभवेल ? सुनें < शुन < श्वन्. आशिया आणि युरप या दोन खंडांतील आर्य लोक अुत्तरध्रुवाकडे अेकत्र राहत होते, तेव्हा त्यांना गुरें, शेळ्यामेंढ्या व कुत्रे अित्यादि प्राणी परिचित होते. यामुळे अेतद्वाचक शब्द लातिन व संस्कृत भाषांत आपसांत समूल अथवा सगोत्र आढळतात. संस्कृत श्वन् वा शुन् याचा सगोत्र लातिन Canis हा शब्द आहे. हा लातिन शब्द हिंदुस्तानांतून युरोपांत तिकडे गेला नाही खास. अर्थात् संस्कृत शब्द शुन हाहि लातिन शब्दाप्रमाणेच अुत्तरध्रुवाकडून आर्यांनी आपल्याबरोबर आणलेला ठरतो. तेव्हा याच्या व्युत्पत्तीसाठीं ऑस्ट्रिकच्या तोंडाकडे पाहावयास नको.

६. साखर हा शब्द जावानी भाषेंतून आला आहे असें लेखक म्हणतात. मला वाटतें तो मूळचाच संस्कृत आहे. शर्कराचा संस्कृतमध्ये अर्थ 'खरखरीत खडी किंवा वाळू' असाहि आहे. साखर व वाळू या दोन अर्थांपैकी मूळ अर्थ कोणता असावा ? वाळू हा पदार्थ निसर्गसिद्ध असल्याने तो अगोदरच लोकांस परिचित असावा. नंतर मनुजनिर्मित साखर वाळूसारखी भरभरीत खरखरीत असल्याने, या धर्मसाम्याने, तोच शब्द साखरेस लावण्यांत आला असावा. शब्द मूलतः नैसर्गिक वस्तूचा बोध करीत असून, पुढे तद्वस्तुसदृश कृत्रिम पदार्थ आढळल्यास, त्या पदार्थासहि तोच शब्द लावण्यांत येतो. निसर्गदत्त करंज्याच्या शेंगेशीं सदृशाकार केलेल्या पक्वान्नासहि करंजी हा शब्द असाच लावण्यांत आला आहे. अशा रीतीने साखर हा पदार्थ व संज्ञा दोनहि भरतखंडोत्पन्न

ठरत नाहीत काय? ऊंस हा शब्द शिक्षु > उच्छु > ऊंस अशा पायऱ्यांनी आला आहे. पैकी मूळ शिक्षु हा शब्द अक्षि पासून आलेला दिसतो. अक्षि म्हणजे डोळा. या अक्षि च्या मुळाशीं ईक्ष् (पाहणें) हा धातु असावा. ऊंस एकप्रकारचें तृण आहे. त्याच्या पेऱ्याचे ठिकाणीं असलेल्या रेघांचा आकार डोळ्यासारखा मानतां येईल. या आकार-साम्याने उसास प्रथम अक्षिदंड किंवा शिक्षुदंड हें नांव पडून, नंतर संक्षेपतः केवळ शिक्षु अशी संज्ञा मिळाली असावी. अशा रीतीने 'शिक्षु'ची व्युत्पत्ति संस्कृतांतच मिळते. 'शब्द ज्या भाषेत व्युत्पत्तीवर हक्क सांगत असेल त्याच भाषेचा तो मूलतः असावा, हें म्हणणें सयुक्तिक आहे. शिक्षु किंवा उच्छु या शब्दाची व्युत्पत्ति इतर भाषा सांगतात काय? केळ या मराठी शब्दाची व्युत्पत्ति कुलकर्णी यांनी 'केलुई' या शब्दापासून मानली आहे. त्यांचे मतें संस्कृत कदली हा शब्द 'केलुई' इ० रूपांनी आढळणाऱ्या एका ऑस्ट्रिक शब्दाचें अपत्य आहे: म्हणजे ऑस्ट्रिक शब्दापासून संस्कृतांत कदली व मराठींत केळ हे शब्द आले आहेत. मला वाटतें, कदली ही संज्ञा संस्कृतांत जन्मली व वाढली, व पुढे मराठी केळ हें अपत्य प्रसवली. प्रा. कुळकर्णी म्हणतात, 'केलुई'चें संस्कृतीभवन कदली. कदली व केलुई यांमधील दुवा कोणता? तो केली किंवा कली असावा. यांत उच्चारसौकर्यार्थ किंवा संस्कृतीकरणार्थ 'द' घुसडण्याचें कारण दिसत नाही. केली किंवा कली यांपैकी कोणताच शब्द उच्चारास अवघड नाही, किंवा कानासहि असंस्कृत लागत नाही. तेव्हा (त्यांत द येण्याचें कारण नसल्याने) कदली हा शब्द केलुईपासून आला नाही हें सिद्ध होत नाही काय?

७. या चर्चेवरून हे शब्द संस्कृतोद्भव ठरतात. इतरहि पुष्कळ शब्द असेच ठरवितां येतील. कुळकर्णी यांनी दिलेले शब्द ऑस्ट्रिकभव असल्यास फारच थोडे असतील. समानार्थी शब्द दोन विजातीय भाषांत रूपतः सदृश आढळल्यास, किंवा एकच शब्द समानार्थाने अशा दोन भाषांत विद्यमान असल्यास ते शब्द मूलतः कोणत्या भाषेचे मानावे? याचें उत्तर देतांना मुख्यतः पुढील पांच गोष्टी विचार्य आहेत. (१) व्युत्पन्नत्व, (२) सबंधुत्व, (३) अनन्यत्व, (४) इतिहास, आणि (५) ध्वनि. एखादा शब्द एका भाषेंत स्वयंसिद्ध असेल तर दुसरींत अन्य शब्दापासून साधलेला म्हणजे साधित किंवा व्युत्पन्न असेल. अशा वेळीं तो शब्द त्या भाषेचा होय की जींत तो व्युत्पन्न आढळतो. या कसोटीप्रमाणें वृन्ताक, उष्ट्र इत्यादि शब्द संस्कृत ठरतात, व अर्थात् त्यांचे तद्भव वांगें उंट इत्यादि यांचा ऑस्ट्रिकशीं कांहीहि संबंध विचारणीय नाही. (२) एकच शब्द दोन भाषांत असतां ज्या भाषेंत त्याचा गोतावळा सांपडेल तीच त्याची मूळ भाषा होय; दुसऱ्या भाषेचा तो दत्तक मुलगा ठरेल. या कारणाने मशक, मनुष्य इत्यादि शब्द शुद्ध आर्य संस्कृत ठरतात. माणूस, माणूसकी, माणूसघाण्या इत्यादि मनुष्याचें गोत सर्वांस परिचित आहेच. असेंच मशक<मच्छर<मच्छरदाणी इ०. (३) एखाद्या नित्यपरिचित अर्थाचा वाचक शब्द भाषेंत एकच असल्यास तो तिचाच औरस होय; दत्तक संभवत नाही. मिशी हें पुरुषाचें अंग निसर्गसिद्ध असल्याने तद्वाचक शब्द घरचाच असावा—अर्थात् त्याच भाषेचा किंवा आजोळचा. असा शब्द श्मश्रु (> मिशी) हा संस्कृतांत अनन्य असल्याने तो ऑस्ट्रिकमधून आला असणें संभवत नाही. (४) जे प्राणी किंवा ज्या वस्तु परदेशांतून आल्या असतील त्या आपल्याबरोबर शब्दहि आणणारच. तेव्हा या संबंधांत इतिहासच निर्णय देणार. या दृष्टीने पाहतां जांब, जोंधळा, ज्वारी, तंबाखू, नारळ, रामफळ, लवंग, मोर इ० वस्तु वा प्राणी परदेशांतून आल्याचें इतिहास सांगत असल्यास त्यांच्या संज्ञा आपण वापरतों त्या सर्वथा दत्तक असल्या पाहिजेत, ही गोष्ट मान्य आहे; आणि हीच काय ती कुलकर्णी यांच्या लेखांतील स्वीकार्य गोष्ट आहे. यांहून इतर शब्दांच्या व्युत्पत्तीविषयी तत्कृत विधानें अत्यंत ढिलाईचीं व अस्वीकार्य अशीं आहेत. व्यक्तिशः शब्दांच्या चर्चेत 'ऑस्ट्रिक शब्द त्या त्या शब्दांचीं मुळें आहेत' असें ते स्पष्ट साग्रह म्हणत नाहीत. परंतु लेखाच्या शेवटाकडे (पान १००) ते म्हणतात:— 'हे आर्य-इंडो-युरोपियन भाषांतील नसावे' असें विद्वानांचें म्हणणें आहे. लगेच पुढे चार ओळींनंतर द्विर्बद्धं सुबद्धं या न्यायाने ते म्हणतात, 'हे शब्द मूळ ऑस्ट्रिक

असावें असें विद्वानांचें म्हणणें आहे.' या प्रकारें ऑस्ट्रिकमूलत्वाचा चढता पक्षपात व्यक्त करुन शेवटीं या मराठी शब्दांचीं मुळें ऑस्ट्रिक होत' हें विद्वानांचें मत समष्टिदृष्टीने लेखकांनी दिलें आहे; आणि हें मत, येथवर दर्शविल्याप्रमाणें, सर्वथा अनुपपन्न असलें तरी, लेखाच्या अंतीं आल्याने वाचकाच्या मनांत स्थिर होण्याचा विशेष संभव. हें अनिष्ट टाळण्यासाठींच हा लेख लिहिला आहे. हा वाचल्यावर स्वतंत्र बुद्धीच्या विचारवंताची निश्चिति होअील की ऑस्ट्रिक शब्दांची प्रा. कुलकर्णीकृत तरफदारी वृथा परधार्जिणी असून, तीपासून मराठी भाषेच्या व्युत्पत्तीची लाभाहून हानिच अधिक होण्याचा संभव आहे.

## अेका रोजनिशींतील नाट्यविषयक अुतारे

(संग्राहक: **चिं. ग. कर्वे**)

['ज्ञानचक्षू'चे संपादक व जुन्या काळचे अेक लेखक वामन बाळकृष्ण रानडे हे लहानपणापासून मोठे चौकस व स्वतंत्र बुद्धीचे होते. ते प्रथम लोकहितवादींजवळ होते. त्यांनी लिहिलेल्या रोजनिशां-तून विविध माहिती सांपडते.]

(१) ता. १३ आगस्ट ८१— अिचलकरंजीकरांचा जयपाळ खेळ बघितला. अुत्तम झाला. हे नाटककार मोठे कसबी आहेत. यांच्याजवळ मोठमोठ्या लोकांचीं सर्टिफिकिटें आहेत.

(२) अिचलकरंजीकर नाटक मंडळीचे प्रयोग तारीख १ आकटंबर ८१ शनिवारीं पूर्ण झाले. यांतील नाअीक विष्णु बाळकृष्ण आपटे राहणार सांवतवाडी बंदर, वेंगुर्लें नजीक आरोली श्रीनाराय-णाचे समोर, रामचंद्र विठ्ठल भिडे वगैरे मंडळी मोठी गुणी आहेत.

(३) ता. १६ मे व ता. २१ मे ८२ मंगळवारीं व रविवारीं शशिकला आणि रत्नपाल नाटकाचा प्रयोग झाला तो चांगला अुतरला. पांडुरंग रामचंद्र ढेरे नाअीक यांनी अुत्तम भाग केला.

(४) ता. ८ जुलअी ८२ शनिवारीं तिसऱ्याने शशिकला नाटकाचा प्रयोग आनंदपर्यवसायी रीतीनें करून दाखविला. वासुदेवराव कानिटकराकरिता केला.

(५) ता. ११ मंगळवारीं जुलअी (८२) गंगाधर अनंत ठाकूर घरीं न विचारतां कोठे अुठून गेला. घरची कुरकुर व अितर कांहीं कारण त्याला अुठून जाण्याला झालें. हुशार मुलगा. शशिकला नाटकांत दाअीचा भाग यानें सर्वोत्कृष्ट केला.

(६) ता. १९ जुलअी ८२ पांडुरंग रामचंद्र ढेरे (शशिकला) कानिटकर-मंडळी सोडून संगीतवाल्याकडे विगरपरवानगीने गेला.- नट, नाटकांत नाचणारे गुणी मुलगे आणि राखलेल्या बायका यांजपासून कधींहि सुख व्हावयाचें नाहीं. हे तीनहि वर्गाचे लोक कधीतरी अधमपणा करून आपल्यावर प्रेम करणारांस खालीं पाहण्यास लावतील.

(७) ता. ९ आगष्ट सन १८८२ बुधवारीं नामदार देशमुख व पांडुरंग रामचंद्र ढेरे मुंबअीस गेले. ढेरे संगीत सोडून गेला हें अेक बरें झालें.

(८) ता. १५ आगष्ट ८२ रोजीं देशमुख परत पुण्यास आले. शंकर बापूजी मुजुमदार याचा स्नेह झाला.

(९) ता. १७ मार्च शनिवार ८३ संगीत सौभद्र नाटक पाहिलें. रा. अण्णा किर्लोस्कर यांणी संगीताची जी रुचि लावून दिली ती प्रशंसनीय होय. हा मनुष्य गुणी आणि कल्पक खरा. नवीन नाटककाराचे मंडळींत अण्णा किर्लोस्कर याचें नांव पहिलें येईल. नाटक फार चांगलें होतें

(१०) ता. १२ मे शनिवार ८३ ... रात्रीं कानिटकर कंपनीचें नाटक प्रतापराव आणि चंद्रानना नांवाचें झालें. तें चांगलें वठलें नाहीं असा लोकांचा अभिप्राय होता.

(११) ता. २८ आक्टोबर ८३ शनिवार—प्रोफेसर विष्णुपंत छत्रे यांचेकरितां कानिटकरांचे घरीं शशिकलारत्नपाल नाटकाचे कांहीं प्रवेश करून दाखविले. आमच्या वेळीं पंडिताने आपला भाग केला नाहीं. मोठा हेकेखोर.

(१२) ता. २४ डिसेंबर सोमवार ८३ रोजीं सीताराम बाबाजी गुर्जर, अश्वघाटी प्रबोधिका, संगीत रत्नावली नाटक व उदार दामोदर नाटक या पुस्तकांचे कर्ते, पुण्यास भेटून परिचय झाला. कादंबरीचें भाषान्तर करणारे हे एक होते.

(१३) ता. ३-१-८५ मार्गशीर्ष शु १५ बद्दलचा कुलधर्म माधवराव देशमुख आणि रामचंद्र हरि सोहनी व रावजी विष्णु भावे सांगलीकर-नाटककारांचे चिरंजीव व कानिटकर नानासाहेब भोजनास आले होते.

(१४) ता. २८-८-८६ शनिवारीं संगीत सौभाग्यरमा हें नाटक बघितलें. विष्णुशास्त्री यांचा भाग अगदी वाईट करतात.

(१५) ता. २८-५-८७ शनिवारीं कोल्हापूरकर नाटक मंडळीचा दुर्गा नाटकाचा प्रयोग झाला. फारच उत्तम वठला.

(१६) ता. २३-७-८७ शनिवारीं मुंबईचे परांजपे संगीत मंडळीने नारायणराव पेशवे वधाचा प्रयोग केला. त्यांतील सुमेरसिंगाचें पात्र करणारे रा. सदाशिव गणेश प्रधान यांच्या उत्तम नाट्यचातुर्याबद्दल त्यांस कानिटकर कंपनीचे तर्फे रा. रा. विनायक सखाराम देशमुख बी. ए. यांणी चांदीचें घड्याळ बक्षीस दिलें व प्रधानांची वाहवा केली.

(१७) ता. १-१०-८७ शनिवार आश्विन शु १५ शके १८०९ सर्वजिन्नाम संवत्सरे नारायणराव कानिटकर साताऱ्याहून आले. ता. २९-९-८७ च्या ज्ञा. प्र. मध्ये "कानिटकरांच्या चांगला परिचित" ह्या सहीने "तरुणीशिक्षण नाटिका आणि तिचे प्रयोग" या सदराखाली एक लेख प्रसिद्ध झाला.

(१८) ता. १५-१०-८७ कोल्हापूरकरांच्या "गुणोत्कर्ष व दुर्गा" ह्या नाटकास ग्रँट रोडवर रिपन नाटकगृहांत गेलों होतों.

(१९) ता. १७-१०-८७ रात्रीं परांजपे संगीत मंडळीची तरुणीशिक्षण नाटिका व्हिक्टोरिया नाटकगृहांत बघण्यास गेलों होतों. पुण्याप्रमाणे मुंबईस समाज बिलकूल जमला नव्हता. उत्पन्न २३० रुपये झालें. मुंबईस ह्या खेळास फार कोणी मोजीत असलेलें दिसलें नाहीं.

---

# आडूचा खेळ



ग. ह. खरे

कानडी भाषेचा मराठी भाषेच्या घटनेवर पुष्कळ परिणाम झाला आहे. तो किती त्याचें संशोधन या दोनहि भाषांचा चांगला व्यासंग असणाऱ्या विद्वानाने करावयास हवें. येथे प्रदर्शित केलेले सारे विचार शास्त्रशुद्ध असतील असें नाही, तथापि विचाराची अेक दिशा त्यांत दाखविली आहे.

कानडीमध्ये हालचाल करणें, नाचणें, खेळणें, अुच्चारणें, आवाज करणें, बोलणें या अर्थी आडु (व क्वचित् त्याचींच रूपें आटु किंवा आलु) असा धातु असून आटु-आडु (खेळणें, खेळ) अट-आट, अड-आड (?) (आवाज, खेळ), आटि-आडि-आळि (खेळणारा), आटक-आटिके-अडिके-अडिगे-आडिगे-आळिके (खेळ),अटिक-अडिग-आडिग-आळिग (बोलणारा, खेळणारा) अशीं कित्येक धातुसाधितें बनलीं आहेत. हा धातु व यांतील कांही धातुसाधितें किंवा त्यांचीं अपभ्रष्ट रूपें यांचा मराठींत अुपयोग केलेला आढळतो. तें मराठी शब्दांचे निरनिराळे गट घेअून स्पष्ट करून दाखवितों.

**१ ला गट—** कोलाटी (का. कौल्लाटिग), कामाठी, कावाडी, कोंगाडी-डी, खिलाडी, नावाडी; (का. नावाडिग), पानाडी; थापाडा, बाताडा, शिंगाडा, सोंगाडा, हेंगाडा; खेळाडु, दामाडु; झोपाळु ?, कामाळु ?, मायाळु ?; कॉल् कोल्-कोलु शब्दाचे कानडींत काठी, बांबू अित्यादि अर्थ आहेत. त्यावरून कोलाट याचा रूढार्थ टिपऱ्यांचा खेळ. पण यौगिक अर्थ बांबू, काठी अित्यादींचा खेळ असा. तो करणारा किंवा काठीशीं खेळणारा तो कोलाटी. याचा अपभ्रष्ट अुच्चार कोल्हाटी. कोल्हाटी लोक बांबूंच्या कैच्या अुभ्या करून त्यांस दोरी बांधतात व तीवरून चालत जातात अथवा थाळींत अुभें राहून ती अेका टोकाकडून दुसऱ्या टोकाकडे सरकवीत नेतात. हें करीत असतांना तोल सांभाळण्यासाठी हातांत बांबू घेतात. तसेंच अेक कोल्हाटी कमरेस फडकें बांधून त्यांत अेक अुंच कळकाची काठी खोचतो व दुसरा तीवर नाना तऱ्हेच्या अुड्या मारून दाखवितो. काठीवरच्या खेळांत काठीस प्राधान्य दिल्यामुळे त्या खेळास कोलाट व खेळकऱ्यास कोलांटी म्हणतात. मुलें अुलटयासुलटया अुडीस कोलांटी किंवा गोलांटी अुडी म्हणतात. कामाशीं खेळणारा किंवा कामच ज्याचा खेळ आहे तो कामाटी-ठी. कामाचेंच अपभ्रष्ट रूप काब (<कांब, <काम); काबाशीं खेळणारा तो काबाडी, कामाटी व काबाडी. या दोहोंचा अर्थ मजूर, कामकरी. काबाड-कष्ट = कामकष्ट हिंदींत खेळाडू अर्थी खिलाडी शब्द वापरतात तोही खेळाशीं खेळणारा असाच बनला असला पाहिजे.

कानडीमध्ये कोंकु-कोंगु म्हणजे वक्रता, विरुद्धता. त्यापासून कोंगाट म्हणजे वक्र वर्तन, विरुद्धाचरण. त्यापासूनच कोंगाडा-डी = मूर्ख मनुष्य असा थोड्या निराळ्या अर्थाचा शब्द मराठींत तयार झाला असावा. हिंदीमध्ये खेळकर या अर्थी खिलाडी हा शब्द आहे तर त्याच अर्थी मराठींत खेळाडू शब्द बनला आहे. याचप्रमाणे दाम अर्थात् पैसा याशीं खेळणारा तो दामाडू म्हणजे सावकार. नावेशीं खेळणारा = नाव चालविण्याचें काम करणारा तो नावाडी आणि पाण्याचा खेळ करणारा अर्थात् पाणी शोधणारा तो पानाडी. थापा मारणारा किंवा त्यांचा खेळ करणारा तो थापाडा किंवा बाताडा. शिंगाशीं खेळणारा अर्थात् शिंग वाजविण्याचें काम करणारा तो शिंगाडा, व सोंगें आणणारा अथवा सोंगें करणारा तो सोंगाडा. हेंगाडा शब्दहि याच वर्गात घातला पाहिजे. मायाळु वगैरे शब्द असेच झाले असतील अशी शंका येते; पण निश्चय नाही.

**२ रा गट**— कडकडाट, खडखडाट, खणखणाट, खळखळाट, गडगडाट, घमघमाट, चकचकाट, चमचमाट, तळतळाट, बुजबुजाट, मरमराट, लखलखाट, गजबजाट, जळफळाट, तडफडाट.

यांतील प्रत्येक शब्दाचें पूर्वपद ध्वन्यनुकारी किंवा स्थितिवाचक असलें तरी अुत्तरपद आट आहे हें लक्ष्य आहे. गडगडण्याचा खेळ तो गडगडाट; खळखळीचा खेळ तो खळखळाट; अितर शब्दहि असेच बनल्याचें स्पष्ट दिसतें. गजबजाट; जळफळाट, तडफडाट हे शब्दहि गजबजणें, जळफळणें, तडफडणें या धातुसाधित नामांस आट शब्द जोडून बनविले आहेत. भरभराट शब्दहि असाच बनविला असावा. मात्र अितर शब्द पुल्लिंगी असतां येवढाच शब्द स्त्रीलिंगी कसा व्हावा हें समजत नाही.

**३ रा गट**— फेकाट, गोंगाट, बोभाट, सोसाटा. केके आवाजाचा खेळ तो केकाट. गों गों आवाजाचा खेळ तो गोंगाट, भो भो आवाज खेळ तो बोभाट-टा. अैतिहासिक कागदपत्रांतून तक्रार या अर्थी बोभाट असाच शब्द येतो. कानडींत बोब्बाट असा शब्द असून त्याचे बोंबलणें, मोठ्याने ओरडणें, मोठ्याने ओरडून तक्रार करणें असे अर्थ आहेत. सो सो आवाजाचा खेळ ज्यांत आहे तो सोसाटा. कानडींत सूसाट असा शब्द आहे; पण त्याचा विखरणें, शिंपडणें, असा भिन्न अर्थ आहे.

**४ था गट**— गंजड, भंगड, दारुडा. दारू, गांजा व भांग यांशीं खेळणारा (आडी), या वस्तु ज्याचा खेळ (आट, आड) बनल्या आहेत, या वस्तूंचें खूप सेवन करणारा तो गंजड-डी, भंगड, दारुडा.

**५ वा गट**— खादाड, पिसाट, वात्रट, हेकट, लाबाड-लबाड-डी अि०.

खादनाचा खेळ करणारा तो खादाड, पिशाचा, वेडेपणाचा-पिशाचतेचा खेळ करणारा तो पिसाट; लपवालपवी खेळणारा तो लबाड. याचप्रमाणे वात्रट, हेकट.

**६ वा गट**— केकाटणें, कोकाटणें, कोंदाटणें, गळाटणें, झपाटणें, रेखाटणें, लाथाडणें, सुखाडणें.

केकेचा खेळ = केकाटणें; कोंदणें, गळणें, रेघा काढणें, सुख पावणें, लाथेने मारणें अित्यादि क्रिया अितर शब्दांच्या मुळाशीं असाव्या.

**७ वा गट**— भुताटकी. भुताचा खेळ ज्यामध्ये आहे ती भुताटकी. अुनाडकी शब्दहि असाच बनला असावा अशी शंका येते.

फार्सीमध्ये खेळणें या अर्थी बाख्तन् हा धातु आहे. त्याचें साधित बाझ् याचाहि असाच प्रयोग केला जातो. अुदा० जान्बाझ् = प्राणाशीं खेळणारा, प्राण ज्याचा खेळ बनला आहे असा. अर्थात् शूर, योद्धा. मराठींत याचा अपभ्रष्ट अुच्चार जहांबाज असा प्रचलित असून तो बहुधा स्त्रियांना लावतात. जहांबाज बायको म्हणजे अुलाढाली, ढालगज स्त्री. जहांबाझ् याचा फार्सीत जगाशीं खेळणारा-री असा अर्थ होअूं शकत असला तरी तशा अर्थी त्याचा प्रयोग आढळत नाही. म्हणून जहांबाज हा जान्बाझ् याचा अपभ्रंशच मानला पाहिजे. दारूशीं खेळणारा तो दारूबाज आणि कुत्र्याशीं खेळणारा तो कुत्तेबाज. हा शब्द अैतिहासिक वाङ्मयांत आढळतो. तन्हेबाज हा शब्दहि लहरी या अर्थाने आलेला सांपडतो.

---

# परीक्षणें



## तत्त्वज्ञान :—

**संतांचा योग** (Yoga of the Saints) :— ले० डॉ. व्ही. एच्. दाते, अेम्. अे., पीअेच्. डी.; प्रका० पाप्युलर बुकडेपो, मुंबअी नं. ७; मूल्य रु. ६.

या ग्रंथाचा मूळ मसुदा मुंबअी विद्यापीठाच्या डॉक्टरेटकरिता सादर करण्यांत आला होता. ग्रंथाचा प्रधान विषय भक्तिमार्ग हा आहे, व या ग्रंथांत त्या विषयाच्या अंगोपांगांचें विवेचन दहा प्रकरणांत करण्यांत आलें आहे. हें विवेचन करितांना महाराष्ट्रसंतवाङ्मयांतील व पाश्चात्य धार्मिक वाङ्मयांतील निवडक प्रसंग व वेंचे ठिकठिकाणीं तुलनेकरिता अुपयोगांत आणले आहेत. ग्रंथ आधुनिक पद्धतीने लिहिला आहे. त्यामुळे भक्तिसंप्रदायी मंडळीस परिचित अशी विचारसरणीच साहेबी पेहेरावांत मांडलेली या ग्रंथांत दिसून येअील, तर अुलट परस्थांस अपरिचित असलेलें संतवाङ्मयाचें ज्ञानभांडार या ग्रंथाने खुलें होअील. धार्मिक श्रद्धा हा आध्यात्मिक प्रयत्नांचा पाया आहे हें दाखवून, वैराग्य म्हणजे काय तें विशद करून मुमुक्षूंस नैतिक व बौद्धिक तयारीची आवश्यकता असल्याचें ग्रंथकर्त्यांनें प्रतिपादन केलें आहे. नंतर पातंजलयोगापेक्षा भक्तिमार्गाची श्रेष्ठता सांगून पुढें श्रवणकीर्तनादि अष्टविध भक्तिप्रकारांचें विवेचन केलें आहे. यापुढील प्रकरणांत नामनिदिध्यास, आत्मार्पण, आत्मप्रतीति, सिद्धावस्था व सिद्धपुरुषवर्णन हे विषय देअून ग्रंथ संपविला आहे.

अशा प्रकारें भक्तिमार्गाचें थोडक्यांत पण समर्पक विवेचन अिंग्रजींत करणारा हा ग्रंथ आहे. प्रा. रा. द. रानडे यांनी आपल्या प्रास्ताविकांत म्हटल्याप्रमाणे लेखक कित्येक वेळां निरूपणाच्या भरांत सांप्रदायिकपणामुळे चिकित्सकतेपासून दूर गेल्यासारखा वाटतो. पण विषयच भक्तिरसाचा पडल्यामुळे तसें होणें साहजिक व क्षम्य मानलें पाहिजे. भक्तिमार्ग हा खरा, परंतु तो निष्ठा ही पदवी प्राप्त करून घेअूं शकत नाही असा जो भक्तिमार्गावर आक्षेप घेण्यांत येतो, त्याचें खंडन केलेलें या ग्रंथांत आढळेल असें वाटलें होतें; परंतु त्याबाबत मात्र वाचकास निराशा पत्करावी लागते.

म. धों. विद्वांस

## मानसशास्त्र :—

**मनाचीं रहस्यें** (Mysteries of the Mind) :— ले० प्रो. पी. श्रीनिवासुलु नायडू, अलाहाबाद युनिव्हर्सिटी; प्रका० सेंट्रल बुकडेपो, अलाहाबाद; किं. रु. २।.

या लहानशा पुस्तकांत कर्त्यांने विविध मानसशास्त्रीय विषयांवर सामान्य वाचकाकरिता सुबोध भाषेत लिहिलेले सोळा लेख अेकत्र छापले आहेत. विवेचनांत शक्य तों कठिण पारिभाषिक शब्द येअूं न देण्याचें धोरण ठेवल्याने सर्वच लेख अिंग्रजी चांगलें वाचूं शकणाऱ्या सामान्य सुशिक्षित वाचकांसहि सुगम वाटतील असेच आहेत. परंतु मानसशास्त्राच्या तज्ञ अभ्यासकांसहि या पुस्तकांतील विवेचनांत ताजेपणा आणि सूचकपणा हे गुण आढळतील. लेखांचे विषय केवळ चाळून पाहिले तरी या पुस्तकाचें आकर्षकत्व वाचकांस तात्काळ प्रतीत होअील. अेका लेखांत स्वप्नांची मीमांसा केली आहे. दुसऱ्यांत युद्धांतील सैनिकांच्या मानसिक रोगांचें स्वरूप वर्णिलें आहे. आणखी अेकांत 'जर्मन राष्ट्राच्या युद्धगंडा'चें विश्लेषण केलें आहे. अेकांत हास्याची मानसिक मीमांसा आली आहे, तर दुसऱ्या अेकांत वाङ्मयांतील अश्लीलतेची मानसशास्त्रीय दृष्टीने छाननी केली आहे. जीवनांत मज्जातंतूंचें (Nerves) केवढें महत्त्व आहे हें आणखी अेका लेखांत वर्णन करून त्यांचें आरोग्य संर-

क्षिण्यासाठी 'सुविचारसमागमा'चा कसा अुपयोग होतो तें सांगितलें आहे. 'सुधारणेचे रोग' या लेखांत मज्जातंतुरोगांच्या बुडाशीं कांही तरी मनोविकृति असते व म्हणून त्याची अुपाययोजनाहि मानसिक स्वरूपाची कशी हवी असते हें सांगितलें आहे. 'दिसतें तसें नसतें' या लेखांत अपसंवेदनाची (Illusion) बरींच गमतीचीं अुदाहरणें दिलीं आहेत. 'अनृतदर्शक' या लेखांत साक्षीदार खोटें बोलतो किंवा कसें हें दर्शविणाऱ्या मानसशास्त्रीय यंत्राची माहिती दिली आहे. मनाची व बुद्धीची मोजणी करणाऱ्या पद्धति, आणि त्यांचा व्यवहारांत, विशेषतः सैन्यभरतींत, कसा अुपयोग करितात याची माहिती आणखी दोन लेखांत दिली आहे. 'जाहिरातींचें मानसशास्त्र' म्हणून अेक लेख आहे, तर मानसशास्त्रीय दृष्ट्या 'चढाओढी'ची अनिष्टता दुसऱ्या अेका लेखांत दाखविली आहे. 'आपण कोणीकडे चाललों आहों' हा शेवटचा लेख तर सर्वांत वाचनीय उतरला आहे. त्यांत मानवी संस्कृतीच्या विकासाचें आजचें स्वरूप व अवस्था लक्षांत घेअून तो विकास हितावह व्हावा या दृष्टीने अत्यंत सूचक असे विचार मांडले आहेत. सारांश, हा लहानसाच परंतु सुगम, सूचक, मनोरम व अुपयुक्त ग्रंथ अिंग्रजी जाणणाऱ्या महाराष्ट्रीय वाचकांनी मुद्दाम वाचावा असा आहे यांत शंका नाही.

दे. द. वाडेकर

**भारतीय मानसशास्त्र परिभाषा**— ले० प्रा. दे. द. वाडेकर; प्रका० बॉम्बे बुक डेपो; मूल्य १० रु.

स्वभाषेच्या द्वारें अुच्च शिक्षण देण्याआड येणाऱ्या गोष्टींत परिभाषेचा अभाव हें फार मोठें कारण आहे. ती अडचण दूर होण्याचा अेक मार्ग म्हणजे त्या त्या विषयांच्या तज्ञांनी आपल्या भाषेंत ग्रंथलेखन करणें हा होय. परंतु त्याकरिता तर परिभाषा लागते, ती स्वतःपुरती तयार करण्यास लागणारें स्वभाषेवरील प्रभुत्व अशा तज्ञांच्या ठिकाणीं नसतें. तेव्हा ते अशा लेखनाच्या भानगडींतच पडत नाहीत. म्हणून स्वभाषेंत शिक्षण देण्यास आवश्यक ते पाठ्यग्रंथ निर्माण होत नाहीत व त्यामुळे तें शिक्षण स्वभाषेंत देतां येत नाही. या चक्रांतून बाहेर पडण्यास त्या त्या विषयांत तज्ञ असलेल्यांनी व त्याचबरोबर स्वभाषेवरहि ज्यांचें चांगलें प्रभुत्व आहे अशांनी अितरांच्या सोअीकरिता काळजीपूर्वक व श्रमाने परिभाषा तयार करून देणें आवश्यक आहे. असें आवश्यक कार्य मानसशास्त्रापुरतें प्रा. वाडेकर यांनी भारतीय मानसशास्त्र-परिभाषा या ग्रंथाने केलें आहे. अिंग्रजी मानसशास्त्राचा त्यांचा सूक्ष्म अभ्यास आहे हें पत्रिकेच्या वाचकांना माहीत आहेच. त्याचबरोबर मराठी व तिची परात्पर जननी संस्कृत भाषा यांचाहि त्यांना चांगला परिचय आहे. यामुळे अशी परिभाषा तयार करण्यास ते पूर्णपणें अधिकारी आहेत हें सांगावयास नको. प्रस्तुत ४०० पानांचा कोश त्यांच्या विद्वत्तेची आणि श्रमशीलतेची चांगलीच साक्ष होय. हा कोश रचण्यांत त्यांची दृष्टि आधुनिक पाश्चात्य मानसशास्त्र मराठींत आणतां यावें अशी आहे. आपल्याकडे पूर्वी जी कांही थोडी मानसशास्त्रचर्चा झाली तिचें अुद्दिष्ट व स्वरूप वेगळें असल्याने त्या परिभाषेचा नवीन मानसशास्त्राची चर्चा करितांना अुपयोग केल्यास कल्पनांचा बराच घोंटाळा होण्याचा संभव असल्याने त्यांनी ती परिभाषा न घेतांना स्वतंत्रपणें आपली परिभाषा सुचविली हें अिष्टच झालें. प्रा. वाडेकर यांनीं दिलेली पारिभाषिक शब्दसंख्या अितकी आहे की मानसशास्त्रावर ग्रंथ लिहिणारास आता परिभाषेची सबब पुढे करितां येअू नये. मानसशास्त्रीय ग्रंथांतील तत्त्वविवेचनच नव्हे, तर शक्य तीं संभवनीय अुदाहरणेंहि त्यांनी डोळ्यांपुढे ठेवलीं असल्याने हा कोश व्यापक, संग्राहक व ग्रंथनिर्मितीस पुरेल अितका झाला आहे. प्रस्तुत परिभाषा अद्यापि निश्चित झाली नसल्याने वाडेकर यांनी अेका शब्दास अितके पर्याय सुचविले आहेत की त्यांतील योग्य वाटेल तो निवडण्यास पुष्कळच वाव आहे. परिभाषा म्हणजे केवळ त्या शास्त्रासच नियत असे शब्द. परंतु मानसशास्त्र हें मानवी जीवनाचे सारेच प्रांत व्यापीत असल्याने त्यांत अनेक सामाजिक व्यवहारांची चर्चा येते. या साऱ्यांकरिता सुचविलेले अनेक शब्द कित्येकांस शुद्धार्थाने पारिभाषिक वाटणार नाहीत. तथापि त्याहि

बाबतींत लेखकांची अडचण अुरूं नये अशी काळजी वाडेकर यांनी घेतली आहे. आपला कोश सर्व भारतीय भाषांना अुपयुक्त व्हावा म्हणून तो प्रा. वाडेकर यांनी केवळ संस्कृतनिष्ठ केला आहे. त्यामुळे शुद्ध मराठी असे जे कांही शब्द असतील ते त्यांना देतां आले नाहींत. अुपलब्ध संस्कृत धातु आणि शब्द यांचीं नवीन अर्थ व्यक्त करणारीं नवीन रूपेंहि त्यांना करावीं लागलीं आहेत. पण तें अपरिहार्य होतें. त्यांची घडण जुन्या मान्य अशा मार्गांनें केली असली म्हणजे झालें.

पण परिभाषा तयार केल्यानें सारें कार्य झालें असें नाही. तिचा विनियोग ग्रंथलेखनांत झाल्याविना ती नुसती कोशांतच पडून राहील. किंबहुना, परिभाषा रूढ करण्याचा सर्वांत परिणामकारक मार्ग म्हणजे त्या परिभाषेंत ग्रंथलेखन करणें हा होय. हें प्रा. वाडेकर यांनी शक्यतों लौकर करावें अशी आमची सूचना आहे. हा कोश तयार केल्याची खरी फलश्रुति ती आहे. तें करतांना आपणच तयार केलेल्या या परिभाषेची व्यावहारिक अुपयुक्तता किती आहे याची त्यांनाच कल्पना येअील. तीमधील कृत्रिम, जड आणि क्लिष्ट भाग आपोआप पाठीमागे पडेल; आणि मग कदाचित् कोशापर्यंत जाण्याची सामान्य लोकांस आवश्यकताहि अुरणार नाही. पण तोंपर्यंत मानसशास्त्रीय लेखन करूं अिच्छिणारांस हा ग्रंथ बहुमोल वाटेल यांत संदेह नाही. **रा. श्री. जोग**

## नाट्यशास्त्र :—

**(१) मराठी रंगभूमीचा अितिहास, खंड १ ला, भाग १ ला— ले० डॉ. य. गं. लेले १९४३, मूल्य रु. २.**

**(२) नाट्यचर्चा— सं. नाट्यचर्चामंडळ, ग्वाल्हेर; मूल्य रु. २.**

नाट्यशताब्दमहोत्सवाच्या निमित्तानें जें वाङ्मय निर्माण झालें त्यांत हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. पहिलें हें डॉ. लेले यांनी लिहिलेलें पुस्तक अभिनवशारदोपासक मंडळानें प्रसिद्ध केलें आहे. ग्रंथाचें नांव मराठी रंगभूमीचा अितिहास असें असलें तरी तो रंगभूमीचा (स्टेज) अितिहास न होतां नाट्यवाङ्मयाचा होणार आहे असें वाटतें. त्या अितिहासांतील पहिल्या भागाचा हा पहिला खंड आहे. परिशिष्टांसहित क्राअुन आकाराचीं शंभरपेक्षाहि कमी अितकीं पृष्ठें त्यांत आलीं आहेत. यांत प्रामुख्यानें तंजावर येथे अि. स. १६८२ ते १८३३ च्या दरम्यान झालेल्या नाट्यवाङ्मयाची माहिती आली आहे. त्यांतहि शहाजी राजे (१६८२ ते १७११) यांच्या नाट्यवाङ्मयाचा परिचय विशेष विस्तारानें करून दिला आहे. जवळ जवळ निम्मा ग्रंथ यांतच खर्ची पडला आहे. मागे शहाजींचें 'लक्ष्मीनारायणकल्याण' हें नाटक राजवाड्यांनी प्रसिद्ध केलें होतें तसल्याच 'लक्ष्मीभूदेवी संवाद' या नाटकाचा सविस्तर परिचय करून देअून त्याच्या अितर नाटकांची त्रोटक माहिती दिली आहे. 'तंजावरचीं नाटकें' या दुसऱ्या प्रकरणांत तेथील अितर नाटकांचा नामनिर्देश तेथील कॅटलॉगवरून दिला आहे. तंजावर येथील ज्ञानकलाभिवृद्धीवर अेक प्रकरण लिहिलें आहे. पहिल्या प्रकरणांत मराठी नाटकांची परंपरा जुनी असल्याचें सांगून शेवटच्या प्रकरणांत तंजावरच्या नाटकांस प्रा. दांडेकर 'पौराणिक' नाटकें म्हणतात त्याअैवजी यक्षगान-भागवत-मेल नाटक म्हणावें असें प्रतिपादन डॉ. लेले यांनी केलें आहे.

आजच्या स्थितींत प्रस्तुत ग्रंथास अितिहास म्हणण्यापेक्षा त्याचें साधन म्हणणेंच युक्त होअील यांतील माहिती व तिची मांडणी असावी तेवढी संपूर्ण व सुसूत्र नाही. तंजावरचीं नाटकें आणि दशावतारी नाटकें यांचा संबंध निर्विवादपणें दाखविला गेला नाही. दशावतार कर्नाटकांतून महाराष्ट्रांत आले, किंवा ते अि. स. १७२८ मध्ये आले व प्रथमतः श्यामजी नाअीक काळे यांनी आणले या गोष्टीलाहि पुरेसा आधार दिला नाही. तसेंच यक्षगान आणि भागवतमेल या नाटकांचें स्वरूप तंजावरच्या नाटकांसारखेंच आहे; ही गोष्ट डॉ. लेले यांनी डॉ. राघवन् यांच्या माहितीवरून गृहीत केली आहे. यक्षगान व भागवतमेल हे दोन्ही अेकच प्रकार होत असें दिसत नाही

मग तंजावरच्या नाटकांस दोन्ही नांवें कशीं देतां येतील ? तें बरोबरहि असेल, तथापि निश्चित विधानें करण्यास यापेक्षा अधिक प्रत्यक्ष संशोधन व्हावयास हवें होतें असें वाटतें. स्वतः लेले हे तंजावरास जाअून नाटकांच्या नकला करून घेअून आले आहेत असें पृ. २० वरील विधानावरून दिसत नाही. पुष्कळशा मराठी नाटकांचीं लिखितें तामीळ लिपींत आहेत हा संशोधनाच्या मार्गांत आणखी अेक अडथळा दिसतो. तंजावरच्या अितर नाटकांची चर्चा याच भागांत यावयास हवी होती. सर्वच ग्रंथ घाअींत प्रसिद्ध केलेला दिसतो. त्याचा परिणाम मुद्रणावरहि झालेला आहे. प्रस्तुतसारख्या विद्वत्ताप्रधान व संशोधनस्वरूप लेखनांत, विशेषतः संस्कृत अुतार्‍यांच्या मुद्रणांत, विशेष साक्षेप हवा. मुंबअी विद्यापीठाने या संशोधनास ३०० रु. दिले ही गोष्ट मात्र समाधानाची आहे. मराठीला विद्यापीठाकडून असें अुत्तेजन मिळाल्याचे प्रसंग थोडे.

ग्वाल्हेरच्या **नाट्यचर्चा** या १६० पृष्ठांच्या पुस्तकांत नाट्यविषयक अनेक अंगांची व प्रश्नांची चर्चा आली आहे. त्यांत पांच लेख नाट्यतंत्रविषयक, पांच नाट्यप्रकारविषयक, सात निरनिराळ्या नाटककारांवरील व अेक स्वतंत्र नाट्यरसपरिपोषविषयक असे आहेत. पहिल्या विभागांत नाटकांतील विनोद, नायिका, संवाद, खलपुरुष, हे विषय आले आहेत; दुसर्‍या विभागांत शोकात्मिका, सुखात्मिका, प्रश्नात्मक नाटकें, अेकांकिका व पटकथा या नाट्यप्रकारांची चर्चा आली आहे, तिसर्‍यांत किर्लोस्करांपासून अत्रे यांच्यापर्यंत सात नाटककारांच्या वाङ्मयाविषयीं विचार केला आहे. लेखकांमध्ये कै. प्रा. बापट (विनोद), प्रा. पराडकर (संवाद), श्री. दामाडे (नाट्यकला व तिच्या सख्या), प्रा. अ. म. जोशी (प्रश्नात्मक नाटकें), प्रा. माचवे (पटकथा), प्रा. दिवेकर, कु. गोदावरी आणि कु. चंपावती केतकर हीं ग्वाल्हेरकडील लेखक म्हणून महाराष्ट्रास परिचित अशींच मंडळी आहेत. नाट्याच्या तंत्राचा, त्याच्या विविध प्रकारांचा व कांही नाटककारांचा परिचय नवीनांस करून देण्याच्या दृष्टीने हें पुस्तक सुगम व अुपयुक्त झालें आहे. नाट्याच्या अंतरंगांत फार खोल न जातां, पण केवळ वरवर परिचयापेक्षा अधिक प्रवेश करून देण्यास समर्थ असें हें पुस्तक झालें आहे. यांत अुणीव अशी की दोन तीन लेख सोडल्यास बाकीचे लेख फार त्रोटक झाल्यासारखे वाटतात. 'शोकात्मिके'सारख्या विषयाची चर्चा केवळ आठ नअू पानांत संपविणें ही गोष्ट अशक्यप्राय असतां करावी लागल्याने विवेचन अपुरें व त्रोटक होणें अपरिहार्य होतें. कांही तंत्रविषयक लेखांस जोडलेली लहानशी वाचनीय पुस्तकांची यादी सर्वच लेखांस जोडली असती तर हा त्रोटकपणाचा दोष कांही अंशांनी भरून निघाला असता. देवल–खाडिलकर–कोल्हटकर–वरेरकर–गडकरी यांवरील लेख ठरलेल्या मर्यादेंत वाङ्मय व गुणदोष यांचा परिचय चांगला करून देतात; पण किर्लोस्करांवरील लेख वाङ्मयापेक्षा व्यक्तीवरच लिहिला गेला आहे, आणि अत्रे यांजवरील टीका आधार वा अुदाहरणें न देतां केल्याने पूर्वग्रहदूषित वाटते. नाट्यमहोत्सव संपले म्हणजे मागे कांही शिल्लक राहील अशा तर्‍हेचें वाङ्मयकार्य केल्याबद्दल ग्वाल्हेरचें नाट्यचर्चामंडळ अभिनंदनास पात्र आहे.

**रा. श्री. जोग**

## काव्य :—

(१) **स्वातितुषार**— कवि–अकिंचन; प्रका० प्र. श्री. गोरे, ७८२ सदाशिव, पुणें २. किंमत रु. १।.

(२) **ओघळलेलें मंगळसूत्र**— कवि–रमातनय, आ. सं. मु., पुणें २; किं. रु. १।.

हा स्फुट भावगीतांचा संग्रह आहे. 'स्वयमनुलक्षी' गीतांपासून 'अज्ञेयानुलक्षी' गीतांपर्यंत विविध प्रकारचीं रसांचीं व भावनांचीं गीतें यांत आहेत. कविसहज हळुवारपणा व भावनाविवशता हीं कुठे कुठे प्रकर्षाने दिसत असलीं तरी आशावादालाहि कवि पारखा नाही. भाषेंत हृद्य अशी सफाअी आहे; पण कांही कांही ठिकाणीं छंदोदोष आढळतात. 'अुलटी गति' या सुभाषितवजा

श्लोकांत (पृ.६३) पृथ्वी वृत्तांतील यतीचा भंग झाला आहे. मुद्रिका जातीसंबंधी घोटाळा झाला आहे. दुसऱ्या ओळींतल्या यतीचा अुपान्त्य वर्ण गुरुच पाहिजे. 'तव ओष्ठसुधा ती सखये' (पृ.२१) येथे 'तव ओष्ठसुधा ती कांते' हें ठीक होतें. 'नववधू' व 'प्रणयप्रमा' यांत आरंभी पंचमात्रिक गण असल्यास गेयतेस साह्य होतें. पृष्ठ ३६ वर 'छंद-दिंडी' असें कवितेच्या शिरोभागीं लिहिलें आहे. 'दिण्डी' हा छन्द नाही. ती जाति होअील. आणि कविता 'अुपजाति' वृत्तांत आहे तें वेगळेंच. असो. रचनेंत असें शैथिल्य व अज्ञानाचे दोष असले तरी कवितेंत प्रसाद बऱ्यापैकी आहे. 'टोकळी' या स्थलवर्णनात्मक कवितेंतलें वर्णन माधवांच्या तळकोकणाची आठवण करून देतें.

**ओघळलेलें मंगळसूत्र :** सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय विद्वान श्री. ना. गो. चापेकर यांच्या चिरंजीवांचा हा पहिला काव्यसंग्रह वाचून त्यांच्या अंगच्या काव्यशक्तीबद्दल पुष्कळ अपेक्षा निर्माण होतात. ध्येयनिष्ठ पण मृदुप्रकृति असें कवीचें व्यक्तित्व सर्व कवितांतून प्रकट होतें. विशेषतः 'विजनवास', 'प्रीतीचा शोध', 'प्रेमवेड्या मालिकेस', 'अुःशाप', 'कीर्तिकण' अि० कवितांत तर तें विशेष अुत्कटत्वाने व्यक्त झालें आहे. कवीच्या भाषेची तारीफ रसिक पहिल्याने करील. आपल्या भावनांचा आविष्कार कसा करावा याचा अंदाज व कौशल्य कवीच्या अंगीं भरपूर दिसतें. मात्रांची जरा सढळ हाताने खैरात, छंदोभंग, 'संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो' या नियमाची पायमल्ली, आणि यमकांची अव्यवस्था हे दोष कवीने प्रयत्नेंकरून काढून टाकले तर त्याचें कवित्व अधिक संपन्न होअील. चिंतनात्मक किंवा कथनात्मक कविता लिहिण्याचें सामर्थ्य कवीजवळ बरेंच आहे. तें त्याने आस्थेने वाढीला लावावें. 'कीर्तिकणां'तला ओघ व आकर्षकता हृदयंगम आहे.

**गोपीनाथ तळवळकर**

## लघुकथा :—

(१) **ज्योति**— ले० आनंदीबाअी किर्लोस्कर; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी.

(२) **विसांव्याचे क्षण**— ले० सौ. मालतीबाअी दांडेकर: प्रका० केशव भिकाजी ढवळे, गिरगांव; मुंबअी.

(३) **फोटोचें लग्न**— ले० वि. कृ नेरुरकर; प्रका० केशव भिकाजी ढवळे; गिरगांव, मुंबअी ४.

कै. आनंदीबाअी किर्लोस्कर यांचा 'ज्योति' हा तिसरा लघुकथासंग्रह. आतापर्यंतच्या त्यांच्या दोन लघुकथासंग्रहांतून स्त्रीजिवनाचीं विविध चित्रें त्यांनी आपल्या कलापूर्ण लेखणीने रंगविलीं होतीं. या त्यांच्या तिसऱ्या लघुकथासंग्रहांत सुद्धा लेखिकेने समाजाला अज्ञात असणाऱ्या स्त्रीजिवनाचे कितीतरी कानेकोपरे अुजळले आहे. वधूपरीक्षेच्या प्रत्येक परीक्षेंत नापास होणारी सुमा, खेडेगांवातील गुंडांच्या त्रासाने व दंडेलीने अगतिक होअून जयरामशीं पाट लावणारी जाअी, मामाच्या वैभवलालसेला बळी पडल्याने चिडून बेताल वागूं लागलेली पुष्पमाला व पुरुषांच्या स्वार्थी व नीच वागणुकीने तोंड पोळल्याने अनिश्चित व अुच्छृंखळ आयुष्य पतकरणारी जयन्ती, अशासारख्या कितीतरी स्त्रियांचे मनोव्यापार लेखिकेने आपल्या कलात्मक लेखणीने मोठ्या कौशल्याने अुकलून दाखविले आहेत. त्यांतल्या त्यांत पतीच्या मनाविरुद्ध पतीला धडा देण्यासाठी, पाऱ्या मोजणाऱ्या कारकुनाचें काम करणारी अिंदु, आअीबापाच्या मनाविरुद्ध फटिंग देसायाशीं स्वतःच लग्न जमविणारी सुमति, व अेका गमतीच्या कारस्थानाने आक्काला फसवून बापूशीं पुनर्विवाह करणारी मनु, ह्या तीन मुलींचीं चित्रें रम्य वाटतात. त्या मानाने 'मालकीण'मधील माधवरावाच्या अधिकाराखाली नमलेली सुमा— किंवा गांवगुंडांच्या त्रासाला घाबरलेली जाअी या अगतिक वाटतात. 'राजाभाअूची नायिका', 'वहिणीची माया' व 'अनुनयाचें द्वंद्व' या तीन गोष्टींची अुभारणी रहस्यावर केलेली असून गोष्टीच्या शेवटीं वाचकांना दिलेला अपेक्षाभंगाचा धक्का गमतीचा वाटतो. परिणामाच्या दृष्टीने 'ताजमहाल' ही

करुणरसपूर्ण गोष्ट अतिशय हृदयस्पर्शी वठली आहे. आनंदीबाअी किर्लोस्कर यांची भाषा ओघवती आहे व त्यांच्या कथेंत रचनेचें कौशल्यहि वाखाणण्याजोगें आहे. आपल्या भोवतालच्या समाजाचें— विशेषतः स्त्रीसमाजाचें— त्यांचें निरीक्षणहि सूक्ष्म आहे. दुर्दैवानें अकालीं मृत्यूचा घाला त्यांच्यावर पडला नसता तर मराठींतील नामवंत लघुकथालेखकांत मानाचें स्थान त्यांनी खात्रीनें मिळविलें असतें.

सौ. मालतीबाअी दांडेकरांचा 'विसाव्याचे क्षण' हा लघुकथासंग्रह मात्र, त्यांचें आजपर्यंतचें लघुकथालेखन विचारांत घेतां, निराशाजनक वाटतो. आजकालच्या बदलत्या सामाजिक व आर्थिक परिस्थितींतील नित्य दिसणारे प्रसंग घेअून त्यांवर कथा लिहिल्या असल्याची ग्वाही लेखिकेनें सुरवातीलाच आपणांला दिली आहे, व अद्‌भुतरम्यतेपेक्षा वास्तवतेशीं त्यांचें नातें अधिक जवळचें ठरेल अशी आशाहि व्यक्त केली आहे. पण 'ला फियाट्', 'सुंदर तारुण्य', 'किसन', 'योगायोग' व 'समुद्र' या कथांतून रंगविलेल्या व्यक्ति व आणलेले प्रसंग पाहिले तर लेखिकेचें मन अद्याप अद्‌भुतरम्यतेंतच कसें घोटाळतें आहे हें सहज दिसून येतें. 'सुन्दर तारुण्यां'तील दरोडा, 'किसन'मधील चोरीचा आळ, 'योगायोग'मधील कालिंदी व कमलाकर यांनी केलेली अेकमेकांची फसवणूक व 'समुद्र'-मधील कालिकाबाअींच्या शुद्धलेखनाचा विनोद हे प्रसंग वास्तववादी कितपत म्हणतां येतील याची शंकाच आहे. मात्र 'दृष्टिदोष'मधील शशीच्या आअीचें चित्र, 'लपंडाव'मधील जगन्नाथाचें चित्र व 'तुरुंगाबाहेर'मधील दिवाकरचें चित्र हीं व्यक्तिचित्रें अत्यंत रम्य रेखाटलीं आहेत. 'दृष्टिदोष', 'तुरुंगाबाहेर', 'लपंडाव', 'द्वंद्वसमास' व 'कावळ्याचं घर गेलं वाहून' या चारच गोष्टी विशेष नांव घेण्यासारख्या आहेत. श्रीमंत व गरीब यांचा झगडा वरील गोष्टींत चांगला दाखविला आहे. पण रचना जितकी कलापूर्ण हवी होती तितकी नाही. अितर गोष्टी सामान्यच आहे. तंत्रदृष्ट्या कदाचित् 'योगायोग' ही कथा कांहीशी चांगली ठरेल.

'फोटोचें लग्न' या लघुकथासंग्रहाचे लेखक श्री. वि. कृ. नेरूरकरहि अद्याप अद्‌भुतरम्यतेच्या कोंडींतून बाहेर आले नाहीत व निर्दोष तंत्ररचनेकडेसुद्धा त्यांनी विशेषसें लक्ष पुरविल्याचें त्यांच्या आंतील कथांवरून दिसत नाही. 'फोटोचें लग्न' ही त्यांची पहिलीच कथा अेकोणीस पानें झाली आहे. मोहन व वृंदा यांच्या अेकमेकांच्या फसवणुकीवर ही कथारचना केली आहे; पण तींत पाल्हाळ फारच आहे, व त्या मानानें स्वभावरेखनसुद्धा विशेष प्रभावी झालें नाही. या पहिल्या कथे-प्रमाणेच अद्‌भुतरम्य घटना व पाल्हाळ त्यांच्या 'तयारी', 'सौंदर्य-सिंधु', 'मिळविला लाल', 'शेठजीचें लटाम्बर' अित्यादि कथांतून दिसून येतो. लघुकथेंत प्रसंगांची जी काटकसर हवी ती तर यांत बिलकूलच नाही; पण अुलट कंटाळवाणी लांबण मात्र कांही कांही ठिकाणीं दिसून येते. त्यांच्या बहुतेक गोष्टी रहस्यप्रधान आहेत पण त्या रहस्यांचा विकास जितक्या कलापूर्ण रीतीनें व कौशल्यपूर्वक करावयास हवा होता तितका तो केलेला नाही. 'आडगांवची शाळा' व 'काटकसर' हीं दोनच चित्रें कांहीशीं बरीं आहेत. अितरत्र सर्व ठिकाणीं अद्‌भुतरम्यतेचें साम्राज्य आहे. **म. ना. अद्वन्त**

## कादंबरी :—

(१) **श्रावणांतील खेडें**— ले० इग्नाजियो सिलोनी; अनुवादक व्यंकटेश वकील; अभिनव प्रकाशन; मूल्य रु. २॥.

(२) **वसुधा**— ले० प. त्रिं. सहस्रबुद्धे, अभिनव प्रकाशन; मूल्य रु. ४.

(३) **ससेमिरा**— ले० व्यं. वि. सरदेशमुख; प्रका० म. मा. केळकर, १९६/८५ टिळक रोड, पुणें; मूल्य रु. २॥.

(४) **साखरगोटी**— ले० रामतनय; प्रका० देशमुख आणि कं., शनवार पुणें, मूल्य रु.५.

**श्रावणांतील खेडें**: अिटालियन लेखक अिग्नाजियो सिलोनी यांच्या फांटमारा या कादं-

बरीचा श्री. व्यंकटेश वकील यांनी हा अनुवाद केला आहे. खेडुतांच्या जीवनाची या कथेंतील विविध दृश्यें त्यांच्यांतीलच अेकेका खेडुताकडून रंगविलीं आहेत. प्रत्येक शेतकरी अेक अेक प्रसंग सांगत असतां त्या कथनांतील तन्मयता व वास्तवता हीं वाचकास कथानकाशीं सहज अेकजीव करतात. या फॅसिझमच्या पद्धतशीर अरेरावीला या खेडेगांवांतील शेतकरी पाहतां पाहतां कसे बळी पडले, हा वृत्तान्त खरोखरच हृदयद्रावक आहे. या खेडुतांच्या भोवतालच्या जगाविषयींच्या कल्पना प्रत्यक्ष अनुभवाने अेकामागून अेक कशा ढासळत गेल्या हें वाचणें हिंदी जीवनाच्या अभ्यासकास बरेंच बुद्बोधक आहे. हिंदी शेतकरी भोवतालच्या राजकीय व आर्थिक अरेरावीविषयीं फाटामारा येथील खेडुतांइतका पुष्कळ जागृत आहे. परंतु ही जागृति त्याला ज्या अनुभवांनी आली तसल्याच अनुभवांची कथा या कादंबरींत आहे. शेतकऱ्यांच्या कल्याणाच्या नांवाखाली शहरांतील गांवगुंड आपली अुन्नति करून घेतात आणि शेवटीं अुघड अुघड अन्यायाच्या आणि अरेरावीच्या गोष्टी करतांनाहि 'हें सगळें तुमच्या कल्याणासाठीच आहे' असें त्यांच्या गळीं अुतरवतात. कोठून तरी त्यांना युद्धाची बातमी कळते, तीसुद्धा युद्धासाठी लादलेल्या कांही बंधनांमुळे ! कोण कोणाविरुद्ध लढत आहे आणि आपण त्यांत कां व कसे गोवले गेलों याचा विचार करावयासहि त्यांना वेळ मिळत नाही. त्यांच्यांतलेच बेकार तरुण 'शहरां'त जाअून सैनिक होतात आणि केवळ पोटाच्या सोयीसाठी आपल्याच गांवकऱ्यांवर मालकाने दिलेला दंडुका अुगारतात ! कोणीतरी खेडुतांना कांही जयघोष करावयास सांगतो आणि तेहि जयजयकार करतात ! शेवटीं त्यांना समजतें की आपल्या नांवाचा अुपयोग करून कोणीतरी 'मधले आडते' राजसत्तेची मेहेरबानगी मिळवतात आणि गरीबाच्या जीवनाची धूळधाण करून गरीबांचे पुढारी म्हणून शहरांत मिरवतात. भोवतालच्या जगांतील फॅसिझमच्या वणव्यांत पांखरासारखीं सांपडलेलीं हीं माणसें त्यांचा सरळ स्वभाव, साधें जीवन, मध्ययुगीन श्रद्धा, कष्टाळूपणा अित्यादि गुणांमुळे जास्तच करुणास्पद वाटतात. ही करुणकथा लोकजागृतीचें कार्य करणाऱ्यांनी लोकसमूहांत जाहीरपणें वाचावी आणि जगाच्या दुसऱ्या भागांत– सुधारलेल्या भागांत– व संपन्न भागांत आपले जे समदुःखी बांधव खितपत आहेत, त्यांची आपल्या बांधवांना ओळख करून द्यावी. कोणत्याहि शाब्दिक वैभवाची जमवाजमव न करतां मूळ जिव्हाळ्याने कथा किती चित्तवेधक होअूं शकते याचें हा ग्रंथ हें आणखी अेक चांगलें अुदाहरण आहे. मूळ लेखकाबद्दल थोडी माहिती पुस्तकाबरोबरच दिली असती तर फार चांगलें झालें असतें. 'व्होल्गा ते गंगा' या प्रसिद्ध अनुवादकृतीप्रमाणे श्री. वकील यांची हीहि अनुवादकृति अभिनंदनीय आहे.

**वसुधा:** अेका विवाहितास आपल्या मानलेल्या बहिणीविषयीं वाटणारें आकर्षण त्याच्या पत्नीस मान्य न झाल्याने अुत्पन्न होणाऱ्या घटना रंगविणारी ही कादंबरी आहे. मुकुंदाला वसुधेविषयी लहानपणापासून प्रेम वाटत होतें. पुढे हेमाशीं त्याचा विवाह झाला तरी त्याची वसुधेच्या सहवासाची अपेक्षा कमी झाली नाही. कारण पत्नीखेरीज मैत्रीण अशी कोणी असणें अवश्य आहे असें त्याचें मत आहे (पृ. १४३). परंतु या मतास पत्नीने मान्यता दिली नाही. शेवटीं पत्नीने गृहत्याग केला. नंतर वसुधा वैवाहिक जीवनांतील छळास वैतागून गृहत्याग करून मुकुंदाच्या आश्रयास आली. परंतु त्याने ज्या मध्यमवर्गीयाच्या अुन्नतीचें कार्य चालवलें होतें त्या वर्गाने त्यांचें तें अेकत्र राहणें मंजूर केलें नाही. शेवटीं तो कामगारचळवळीकडे वळला. कामगारसमाजाने मात्र त्यांच्या सहजीवनास सम्मति दिली, आणि शेवटीं आपल्या पत्नीचा– हेमाचा– संकुचित दृष्टिकोण व्यापक करण्याची अुमेद धरून मुकुंदाने हेमाचाहि स्वीकार केला. अशा अेकंदर घटना कादंबरींत आहेत. विवाहबाह्य स्त्रीसहवास पत्नीने मंजूर करावा यासाठी मुकुंदाने केलेला अट्टाहास व लेखकाने केलेला समेट अत्यंत विचित्र आहेत. वसुधेविषयींची ओढ ही वैवाहिक जीवनाशीं विसंगत आहे हें सत्य डावलण्याचा लेखकाने फार अट्टाहास केला आहे. ती विसंगति मान्य न करण्याबद्दल हेमावर– पत्नीवर– संकुचित दृष्टिकोणाचा आळ घेतला आहे. परित्यक्ता स्त्रीने परपुरुषाच्या घरीं त्याची पत्नी घरांत नसतांना कायमचा मुक्काम ठेवणें हें मंजूर नसल्याबद्दल मध्यमवर्गावर तोंडसुख घेतलें आहे आणि

कामगारसमाजाने तें पत्करल्याचें सांगून (पृ.१५०) कामगारसमाजाचीहि निंदाच केली आहे. हेमा दारिद्र्याच्या यातना असह्य झाल्यामुळें पुन्हा परत आली. तिला पश्चात्ताप झाला नाही. परंतु तिचा दृष्टिकोण व्यापक करून आपल्या घरांत वसुधेला जागा करण्याची अुमेद नायकाने बाळगली आहे. अितका व्यापक दृष्टिकोण असणारी पत्नी कशी असते हें कादंबरीकाराने दाखविलें असतें तर बरें झालें असतें ! वसुधेविषयींचें भगिनीप्रेम श्रेष्ठ ठरविण्यासाठी सख्या बहिणी व रक्ताचीं नातीं यांना सरसकट बाजारी ठरविलें आहे (पृ.११८-१२०). त्या प्रेमाला केवळ मुकुंदाने सात्त्विक म्हटलें म्हणजे हेमानेहि मान तुकवावी ही अपेक्षा अगदीच मूर्खपणाची आहे. कारण तें भगिनीप्रेम म्हणण्याअितकें सात्त्विक नाही. वसुधेच्या सहवासाच्या अपेक्षेंत प्रियकरास प्रेयसीबद्दल वाटावें तसा भाग असल्याची मुकुंदानेच कबुली दिली आहे (पृ.७३). वसुधा झोपली असतां तिचें चुंबन घेण्याचा त्याचा प्रयत्न कळल्यावर त्या प्रेमाला भगिनीप्रेम म्हणणें म्हणजे भगिनीप्रेमाचें विडंबन नव्हे काय ? आणि त्याचा तो प्रयत्न हेमास–पत्नीस– कळल्यावरहि त्या प्रेमाविषयी शंका घेण्याबद्दल तिला संकुचित ठरविणें, तिच्याबरोबर अेकदम मध्यमवर्गावर घसरणें, हें केवळ 'शेपं कोपेन पूरयेत्' यासारखें नाही काय ? वसुधेच्या ओढीमुळे हेमांत मुकुंदाला नसते दोष दिसूं लागले. वस्तुतः तसे तिच्यांत कांहीहि दोष नाहीत. अशा तऱ्हेची विवाहबाह्य स्त्रीसहवासाची ओढ वाटणें हें कदाचित् शक्य व स्वाभाविक असलें, तरी त्या ओढीस पत्नीने विरोध करणें, समाजाने विरोध करणें, हेंहि तितकेंच अपरिहार्य नाही काय ? या दोन वस्तुस्थितींची सांगड घालणें हेंच विचित्र आहे असें आम्हांस वाटतें. सेवेसाठी पत्नी आणि बौद्धिक कौतुकासाठी मैत्रीण अशी अपेक्षा पतीला कोणत्या समाजव्यवस्थेंत मिळेल ? यशस्वीपणें दुहेरी जीवन जगणें हा अेकच मार्ग त्याला मोकळा आहे. सवतीपेक्षाहि प्रिया व पत्नी हें द्वंद्व भयंकर आहे. आणि तें अपरिहार्य आहे !

या कथाप्रसंगाची पार्श्वभूमि म्हणून रंगविलेलीं कामगारजीवनाचीं चित्रें, ४ फेब्रु. १९३० च्या रेल्वे कामगार संपाचे प्रसंग अतिशय परिणामकारकपणें रेखाटले आहेत. त्या चळवळींत नायकाने केलेली कामगिरीहि ध्येयवादी कार्यकर्त्यासारखी आहे. परंतु त्या कार्याशीं त्याच्या वैयक्तिक जीवनाचा जोडलेला धागा फारच कमकुवत आहे. मुख्य प्रमेय असें लुळेपांगळें झाल्याने सामाजिक जीवनाचीं वरील दृश्यें कादंबरींत अस्थानीं वाटतात.

**सखेगिरा :** श्री. त्र्यं. वि. सरदेशमुख यांची पहिलीच कादंबरी आहे. परंतु प्रत्यक्ष कादंबरी वाचल्यावर अप्रसिद्धपणें त्यांनी कादंबरीलेखनाचा चांगलाच अभ्यास केला आहे असें दिसतें. कथानकाची रचना, प्रसंगोपात्त केलेल्यीं वर्णनांत दिसून येणारें सूक्ष्म अवलोकन, निरनिराळ्या प्रसंगीं त्या त्या प्रसंगांतील व्यक्तींचीं मानसिक आंदोलनें वर्णन करतांना व्यक्त होणारें मनोविश्लेषण, अित्यादि गुणांनी कादंबरीचें वाचन चित्तवेधक होत जातें. आपल्या लेखनकौशल्याने त्यांनी अेका दुर्दैवी विवाहित स्त्रीच्या जीवनाची करुणकथा रंगविली आहे. ही कथा सांगतांना टॉलस्टॉयच्या 'क्रूझर सोनाटा' या कथेसारखें तंत्र अुपयोगांत आणलें आहे. त्या स्त्रीने स्वतः अेका प्रवाशास हकीगत सांगितली आणि हकीगतीच्या शेवटाबरोबरच-तिनेहि आत्महत्या केली ! मालतीच्या विवाहाच्या पूर्वीच तिच्या वैवाहिक जीवनांतील यातनांचीं बीजें पेरलीं होतीं. तिच्या आअीला तरुणपणीं आलेल्या वैधव्यांत तिचा साहाय्यक म्हणून विश्वनाथ जवळ आला आणि समाजांत अेक प्रसिद्ध संपादक म्हणून वावरणाऱ्या त्या सभ्य गृहस्थाने मालतीच्या आअीला आपल्या वासनेला बळी दिलें, व पुढे मालती विवाहयोग्य झाल्यावर तिच्याशींहि विवाह केला. मालतीला ही स्थिति कळतांच तिच्या काव्यात्म मनाची जी तीव्र प्रतिक्रिया झाली ती या कादंबरीचा मुख्य विषय आहे. लष्करांत असणाऱ्या मंदार नांवाच्या तरुणावर प्रेम करण्यास प्रारंभ करून विवाहित स्त्रीस सध्याच्या कालीं न शोभेल अितक्या स्वैरपणें ती वागूं लागते. मंदार लढाअीवर गेला व तेथे त्याचा अंत झाल्याचें पत्र आलें. तें घेअून मालती प्रवासास निघते व आपली हकीगत अेका अपरिचित तरुणास सांगून घाटांतील दरींत अुडी

टाकून आत्महत्या करते. मालतीचें स्वैर वर्तन प्रतिक्रिया म्हणून स्वाभाविक असलें तरी त्यामुळे तिज-विषयीच्या सहानुभूतीमध्ये त्यामुळे उणीव येते, तसेंच तिच्या या वर्तनाचा बंदोबस्त करण्याचे तिच्या पतीचे प्रयत्न व मार्ग अितके दुबळे व आडवळणाचे वाटतात की खल म्हणून कल्पिलेल्या या पात्रांत बावळटपणा व नादानपणाच अधिक दिसतो. नायिकेच्या स्वभावाने व वर्तनाने या कादंबरीस अद्भुताचें स्वरूप येअूं पाहत आहे.

करुण व करुणरसाच्या पार्श्वभूमीवर शृंगार अशा दुहेरी रसाविष्काराने कथानक मात्र आकर्षक झालें आहे. नायक मंदार याचा मित्र रोनाल्ड याचें चित्र नायकापेक्षा अधिक अुदात्त वाटतें. लष्करी जीवनांत वाटसरूप्रमाणे भटकणारा हा तरुण कोठेतरी आकस्मिकपणें अनुभवास आलेल्या स्त्रीसहवासाच्या स्मृतीवर आपलें अेकाकी जीवन शिपायाच्या कणखरपणाने व खिलाडू वृत्तीने जगत असतो. कोणता अेखादा प्रश्न सोडविण्याचा अट्टाहास लेखकाने या कादंबरींत केला नाही हेंहि या कथेच्या मनोरंजकतेचें कारण असूं शकेल. गं. भा. निरंतर

**साखरगोटी :** श्री रामतनय हे ग्रामीण जीवनावर कादंबरीलेखन करणारे म्हणून साहित्य-भक्तांस माहीत आहेत. खेडेगांवांतील जीवनाचा त्यांना पूर्ण परिचय आहे आणि ते तेथील वातावरण चांगलें रंगवूं शकतात. खेडेगांवचे प्रश्नहि त्यांना माहीत आहेत. साखरगोटी या नांवास पात्र झालेल्या अेका आंब्याच्या झाडाच्या मालकीबद्दल झालेल्या भांडणांतून या कादंबरीचें कथानक निर्माण झालें आहे. अेकंदरींत क्षुल्लक विषयांवरून होणारी प्राणांतिक भांडणें, अेका पिढीकडून पुढील पिढीपर्यंत येणारी वैमनस्यें व खेडेगांवांतहि आढळणाऱ्या सज्जन, तेजस्वी, खल, दांभिक, मूर्ख अित्यादि लोकांचें जीवन या कादंबरींत बहुतांशीं यथार्थपणें रंगविलें आहे. १९४२ च्या राजकीय चळवळीचा आणि लढाअीच्या वातावरणाचा अुपयोग करून कादंबरी अद्ययावत् करण्याचा प्रयत्न लेखकाने केला आहे. कथानकरचना गुंतागुंतीची असली तरी सुश्लिष्ट नाही. व्यक्तिदर्शन बरेंचसें संपूर्ण असलें, तरी कलात्मक नाही. हिंमतरावाच्या अखेरपर्यंत अज्ञातवासाचें रहस्य अुलगडत नाही. शीख नांवाखाली वावरणाऱ्या या मराठा माणसास कोणी ओळखूं शकत नाही हें सहज विश्वास बसण्याजोगें नाही. नायिका रंगी व नायक सावळ्या यांचीं चित्रें ठसठशीत वठलीं आहेत. खेडेगांवांच्या अुद्धाराचा अेखादा नवीन मार्ग या कादंबरींत सुचविला आहे, किंवा अेखाद्या ग्रामीण प्रश्नाचें मूलगामी दिग्दर्शन तींत झालें आहे, असें नाही. खेडेगांवचें वातावरण ज्यांना जाणावयाचें आहे आणि स्थूल भावनाचित्रें व त्यांना साजेसें कथानक ज्यांना पुरेसें वाटेल अशांना ही कादंबरी मनोरंजक वाटेल. रा. श्री. जोग

## चरित्रें :—

(१) **बहुजन समाजांतील कर्मवीर**— ले० द. रा. दरेकर; प्रका० सौ. कमलाबाअी द. दरेकर, २३१ वेताळ, पुणें; मूल्य रु. ३.

(२) **डॉ० बाळकृष्ण**— ले० मा. रा. वाळंबे; प्रका० आर्य बुकडेपो, लक्ष्मीपुरी, कोल्हापूर; मूल्य आणे ८.

**बहुजनसमाजांतील कर्मवीर :** नअू कर्मवीरांचीं चरित्रें या पुस्तकांत रा. दरेकरांनी रेखाटलीं आहेत. त्यांपैकी चार दिवंगत व बाकी विद्यमान पुरुषांचीं आहेत. मराठासमाजांत स्वाभिमान अुत्पन्न करणारे आद्य पुढारी ज्योतिराव फुले व नुकतेच परलोकवासी झालेले अस्पृश्यांचे अुद्धारक अण्णासाहेब शिंदे यांचीच कांही माहिती पुढारलेल्या वर्गास असे. म्हस्के आणि धामणस्कर यांचा कांहीसा परिचय जुन्या पिढीतील मंडळींना असेल. नवीनांना बहुशः जेधे आणि जगताप ओळखीचे आहेत. पण मराठावर्गाच्या खालच्या थरापर्यंत भाअूराव पाटील आणि शामराव देसाअी

या कट्टर सत्यशोधकांविषयी मोठा आपलेपणा आहे यांत नवल नाही. प्रि. गाडगीळ यांनी आपल्या मार्मिक प्रस्तावनेंत दाखवून दिल्याप्रमाणे बहुजनसमाजासाठी (नुसत्या ब्राह्मण किंवा मराठा समाजासाठी नव्हे) व अखिल राष्ट्रासाठी अखंड झिजून त्याच कार्यांत देहत्याग केलेल्या ब्राह्मण कर्मवीरांविषयी ब्राह्मणेतर समाजाला ते 'आपल्यांतले' असें जें वाटत नाही त्याला कारणें निराळीं आहेत. या ब्राह्मण देशभक्तांविषयी मराठासमाजांत जो गैरसमज आज आहे तोच उद्या मराठा कर्मवीर-देशभक्तांबद्दलहि अितर खालच्या समाजांत अुत्पन्न होणार आहे, नव्हे कांहीसा झालाहि आहे. असो. रा. दरेकर यांची आपुलकीची संकुचित दृष्टि सोडून दिल्यास त्यांनी जमवून दिलेली माहिती सर्वांनाच अुपयुक्त आहे. त्यामुळे या 'कर्मवीरां'विषयी आदर नसलेल्यांतहि तो अुत्पन्न होईल. आज सत्यशोधकी चावटळ काँग्रेसच्या कार्याने थंडावली असल्याने या मराठासमाजांतील कार्यकर्त्यांचे थोर गुण व त्यांची अुपयुक्त कार्यपद्धति सर्वांच्या नजरेस पडून त्यांचा खरा गौरव यापुढेच होणार आहे. तेव्हा रा. दरेकर यांनी आपल्या चरित्रलेखनाला नवीन विषय घेतल्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें पाहिजे. प्रत्येक चरित्रनायक अद्वितीय असें सांगण्याने तारतम्याचा अभाव दिसून येतो व लेखन 'लीलामृता'प्रमाणे चिकित्सक वाचकाला वाटूं लागतें. तरी लेखकाने या दोषांची जाणीव आपल्या यानंतरच्या 'दीपगृहां'त ठेवावी अशी सूचना आहे.

**डॉ. बाळकृष्ण :** यांचा हा जीवनवृत्तान्त लेखकाने सहृदयतेने लिहिला असून, त्यांत डॉक्टरसाहेबांच्या अठ्ठावन वर्षांच्या आयुष्यक्रमाचा चांगला आढावा घेतला आहे. डॉ. बाळकृष्ण हे कोल्हापूरच्या कॉलेजचे प्रिन्सिपल व अितिहासलेखक अेवढाच बहुधा परिचय, निकटवर्ती थोडी मंडळी सोडून, बहुतेकांना जो होता तो या वृत्तान्तवाचनाने वाढेल, अेवढेंच नव्हे तर डॉ. सुखटणकरादि महाव्यासंगी विद्वानांच्यां पंक्तीला त्यांना घेण्यास अभिमानच वाटेल. असे प्रतिभासंपन्न राष्ट्रीय कार्यकर्ते प्रत्यक्ष राजकारणांत नसल्याने बहुजनसमाजाच्या नजरेआड असतात. तेहि मानाचे भुकेले नसतात. अुलट, संकोचाने मागे मागे राहतात. असो. डॉ. बाळकृष्ण यांची मराठ्यांच्या अितिहासासंबंधीची कामगिरी चिरस्मरणीय असल्याने त्यांचा हा मराठींतील जीवनवृत्तान्त वाचण्याला आपुलकी साहजिकच वाटते. त्यांच्या वाङ्मयाचा विस्तृत परिचय करून देणारा मोठा ग्रंथ स्मारकसमिति लवकरच काढील अशी आशा बाळगून आहों.

चिं. ग. कर्वे

## विविध :—

(१) **थोरांच्या सहचारिणी**— ले० कमल फडके; प्रका० दा. ना. मोघे, स्कूल अँण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. १॥।.

(२) **प्रतिभालांछन**— ले० शंकर कृष्ण देवभक्त; प्रका० रा. शं. पटवर्धन; मूल्य रु. २॥.

(३) **तरुण भारत**— संपा० ग. त्र्यं. माडखोलकर; मूल्य रु. १.

**थोरांच्या सहचारिणी :** सदरहू पुस्तक म्हणजे "वाअिव्हज् ऑफ् फेमस् मेन्" नांवाच्या अेका अिंग्रजी पुस्तकाचें भाषान्तर होय. स्तालिन्, रुझवेल्ट, आअिन्स्टाअिन्, गांधी, नेहरू यांसारख्या व्यक्तींसंबंधी आज चारी खंडांत केवढें कुतूहल आहे हें सांगणें नकोच. मोठ्या व्यक्तींच्या खाजगी जीवनासंबंधी तर अधिकच कुतूहल असतें. आणि पत्नी म्हणजे खाजगी जीवनाची नायिकाच होय. या दृष्टीने पाहतां सदर पुस्तकाचा विषयच आजच्या जगाची प्रमुख भूक भागविणारा आहे.

सौ. कमला फडके यांनी मूळ अिंग्रजीचें भाषान्तरहि सफाअीदार केलें आहे. सदर पुस्तकाच्या योगे चौकस प्रौढ वाचकांस माहिती आणि मनोरंजन या दोहोंचाहि लाभ अेकदमच होण्यासारखा आहे. लेखिकेची अिच्छा सदर पुस्तक शाळेंतील मुलांमुलींना पुरवणी वाचन अथवा पाठ्यपुस्तक म्हणून अुपयोगी पडावें अशी आहे. आज पुरस्कृत होणाऱ्या कित्येक पुस्तकांहून सदर पुस्तक अधिक शालोपयोगी आहेहि. तरी ज्यांच्या भार्यांची सदर शब्दचित्रमालेंत चमत्कृतिप्रधान (Dramatic) पद्धतीने माहिती दिली आहे, त्यांची स्वतःची माहितीच आमच्या मुलांना आणि मास्तरांनाहि बेताची

असणार या दृष्टीने पाहतां अशा पुस्तकाचा पुष्कळसा उपयोग करून त्यांतील विषय हिंदी मुलां-करिता नव्यानेच सांगणें अधिक बरें. तरीहि सदर पुस्तक शाळांच्या संग्रहांतील अनेक पुस्तकांहून अधिक पुरस्कार्य आहे याबद्दल मात्र वाद नाही.

पुस्तकांत– निबंधरूप पुस्तकांत– घरगुती भाषा घालण्याचा प्रकार हल्ली कांही प्रसिद्ध लेखक करीत आहेत. आमच्या मतें हें अनावश्यकहि आहे आणि भाषेच्या प्रौढतेच्या, शुद्धतेच्या आणि स्थिरतेच्या दृष्टीने अनिष्टहि आहे. प्रसिद्ध लेखकांचें अनुकरण करणाऱ्या लेखकलेखिकांनी याचा विचार करावा. सदर पुस्तक भाषान्तररूप असूनहि भाषेंत धेडगुजरीपणा अगर बोजडपणा मुळीच नाही हें मुद्दाम सांगितलें पाहिजे. तरी क्वचित्— "शॉची स्वारी तेथे असावयाचीच ही वेबच्या मित्र-मंडळींत कांही नवलाची गोष्ट नव्हती." या वाक्यासारखीं व्याकरणाच्या आणि अर्थाच्या दृष्टीने गोंधळांत पाडणारीं वाक्यें आहेत. तसेंच "कस्तुरबांच्या निर्बुद्धपणाची...परभावधी..." यासारख्या शब्दप्रयोगांत मूळ ग्रंथ अगर वर्ण्य व्यक्ति यापैकीं कोणाचा तरी विपर्यास झाल्यासारखें वाटतें.

अेक दोन गोष्टी सदर भाषान्तराच्या निमित्ताने सांगणें जरुर वाटतें. मराठी वाचकांपुढे अेखाद्या अिंग्रजी पुस्तकाचें भाषान्तर टाकतांना मूळ लेखन व लेखक यांची माहिती प्रस्तावनेंत सांगणें जरूर आहे. कारण पाश्चात्य ग्रंथ म्हटला की तो तिकडचा विख्यात ग्रंथच असला पाहिजे अशी कित्येक वाचक समजूत करून बसतात. दुसरी गोष्ट म्हणजे भाषान्तरावर मराठी भाषांतरकर्ते लेखक म्हणून स्वतःचें नांव घालतात हें अयोग्य आहे. अर्थात् सौ.फडके यांनीच हें सुरू केलें असेंहि नव्हे किंवा त्यांत त्यांचा कांही हेतु आहे असेंहि नव्हे. ही चाल दुसऱ्या कोणत्याहि देशांत आढळणार नाही. अिंग्रजींत टॉल्स्टॉय् अगर रोमाँरोलाँच्या पुस्तकाचें भाषान्तर झालें तर त्यावर कर्ता म्हणून भाषान्तरकर्त्याचें नांव आणि प्रस्तावनेंत मूळ लेखकाचें नांव असें कधी घडणार नाही. आमच्याकडे मात्र "नेहरू यांचें आत्मचरित्र– लेखक भाओी गोरे" असा निर्देश पुस्तकाच्या मुखपृष्ठापासून ग्रंथशाळेच्या कॅटलॉगपर्यंत सर्वत्र आढळेल ! सौ. फडके यांजसारख्या स्वाभिमानी व सुविद्य लेखिकांनी या अडाणी फॅशन्ला कलाटणी देणें जरूर आहे.

**प्रतिभालांछन :** सदर पुस्तक म्हणजे फडके यांच्या "प्रतिभासाधन" आणि "माझ्या साहित्यसेवेंतील स्मृति" या दोन पुस्तकांची प्रतिक्रिया होय. पैकी "प्रतिभासाधन"वाद यापूर्वीच निकालांत निघाला अशी सर्वांचीच समजूत असणें साहजिक होतें. पण फडके यांच्या "स्मृतीं"त त्या प्रकरणाचा पुनः अुल्लेख झाल्याने आणि त्या "स्मृतीं"त "अनिवार्य आणि अप्रामाणिक आत्म-श्लाघेला परनिंदेची जोड मिळूं लागली .." असें श्री. देवभक्त यांस आढळून आल्याने त्यांनी "फडके थापा मारूं नका" ही लेखमाला लिहिण्यास सुरवात केली. त्या लेखमालेसच आता पुस्तक-रूप देअून प्रतिमालांछन हें नांव दिलें आहे.

रा. देवभक्त हे गडकरीसंप्रदायांतील अेक प्रसिद्ध विनोदी लेखक आहेत. विनोदी लेखकास जेव्हा आपण दंभस्फोट करीत आहों अशी श्रद्धा लाभते, तेव्हा त्याच्या हास्यरसांत वीररस सळसळूं लागतो. रा. देवभक्त यांनी सदर पुस्तक प्रामाणिक श्रद्धेने लिहिलें याबद्दल शंका घेण्याचें कारण नाही; आणि ते विनोदी लेखक आहेत हें तर प्रसिद्धच आहे. फडके आणि त्यांच्या स्मृति याहि महाराष्ट्रीय वाचकांस विश्रुतच आहेत. या सर्वसमुच्चयामुळे सदर पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वीच प्रसिद्ध झालें आहे असें म्हटलें तर ती केवळ अतिशयोक्ति अगर भाषालंकृति नव्हे.

रा. देवभक्त यांची मूळ लेखमाला प्रत्येक मराठी वाचकाने अत्यंत औत्सुक्याने वाचली असेल आणि वाचल्यावर देवभक्तांच्या लेखणीची तारीफ केली असेल यांत शंका नाही. पण ग्रंथ म्हणून या लिखाणास कितपत महत्त्व येअील हा प्रश्नच आहे. रा. देवभक्त– आणि अितरहि टीकाकार– फडके यांजबद्दल म्हणतात तें सर्व संपूर्ण सत्य असेल तर त्यांच्या चरित्रांतील अेक दोन प्रकरणासंबंधी स्वतंत्र ग्रंथ होणें म्हणजे कालापव्यय होय हें ओघानेच येतें.

आमच्या मतें या बाबतींत अत्रे, देवभक्त, य. गो. जोशी यांसारखी मंडळी चुकीचा मार्ग चोखाळीत आहेत. महाराष्ट्रांत कांही लेखकांच्या विरुद्ध जितक्या वेळां आणि जितकें कडक लिहिलें गेलें आहे की दूषितांहून दूषकच अधिक दोषी ठरण्याचा प्रसंग पातला आहे. उत्तर हिंदुस्तानांतील रामलीलेंत दरसाल रावणवधाचा प्रयोग करून लोक आपली पापनिषेधाची भूक भागवितात, तशांतला हा समारंभ होत आहे असें वाटूं लागतें. पण या निषेधाच्या अतिरेकाचें मूळ पूजनाच्या अतिरेकांत असतें. महाराष्ट्रांत प्रथम चुकीचें मूर्तिपूजन सुरू होतें व नंतर चुकीचें मूर्तिभंजन सुरू होतें. या दोन्ही ऊर्मींना राष्ट्रीय नफानुकसानीच्या दृष्टीने अेकच नांव म्हणजे "waste" किंवा अपव्यय हें होय.

फडके यांनी "प्रतिभासाधन" लिहिलें किंवा कॉलेज सोडलें, तरी त्या दोन क्रियांसंबंधी योग्य तेंच मूल्यमापन झालें असतें, तर मागाहून त्या क्रियांतील गौणत्व लक्षांत येतांच महाराष्ट्रांत अेवढी आरडाओरड-झाली नसती. प्रतिमासाधनवादाच्या सुमारास बर्नार्ड शॉ हे मुंबअी बंदरांत किंचित् काळ थांबले होते. अेका संपादकांनी त्यांची मुद्दाम गांठ घेअून– त्यांच्या मतें !– हें अखिल भारतीय वादळ शॉ यांच्या कानांवर घातलें. शॉ यांनी त्यांत कांहींच नाही असें दाखवून "ग्रंथचौर्य हा प्राध्यापकांचा जन्मसिद्ध हक्कच आहे !" हें सदर संपादकांस माहीत नसल्याबद्दल आश्चर्य व्यक्त केलें. अर्थात् यांतील थट्टेचा भाग ज्ञाते ओळखतीलच; तथापि फडक्यांच्या असोत, अगर अतिरिक्त टीकाविषय झालेल्या अन्य प्रसिद्ध लेखकांच्या असोत, दूषिलेल्या गोष्टींहून प्रशंसिलेल्या गोष्टींचेंच अधिक आश्चर्य वाटतें.

आज गाजलेल्या बहुतेक लेखकांच्या विचारांत स्वतंत्र बुद्धि अगर नावीन्य किती असतें हें ज्यांस कळेल त्यांस अेकाच पुस्तकावर मर देणाऱ्या– पण स्थूल मानाने अुपयुक्त आणि सुंदर– अशा प्रतिभासाधनाबद्दल अेवढा क्रोध येणार नाही. "रक्ताने लिहिणारे लेखक" यासारखा जळजळीत शब्दप्रयोग वाचतांच आमचे वाचक तो त्या लेखकाचा म्हणून गौरवपूर्वक उद्धृत करतात. पण तो पडछायेची पडछाया, पडसादाचा पडसाद असतो. तीच गोष्ट वाङ्मयीन अगर समाजशास्त्रीय अुपपत्तींची. क्लेटन् हॅमिल्टनचे परिच्छेद, तसे न सांगतां (without acknowledgment) अुतरले तर गवगवा होतो. क्रोचेचे परिच्छेद घेतले तर तें ओळखतहि नाही !

ज्यांनी दुसऱ्याचे विचार प्रत्यक्ष चोरले नाहीत, पण ज्यांच्या लेखनांत स्वतःचा असा अेकहि मूल्यवान् विचार सांपडणार नाही, असे अनेक लेखक महाराष्ट्रांत प्रसिद्धि पावले आहेत. प्रत्यक्ष अुसनवारीहूनहि हे अधिक मोठें असें "महाराष्ट्रीय प्रतिभालांछन" होय असें आम्हांस वाटतें. ज्या समाजास सूक्ष्म पापें ओळखण्याची पात्रता नसते, तो समाज अेखादें ढोबळ पाप आढळतांच तें फासावर लटकाविण्याचा मोठा समारंभ करतो.

अर्थात् क्लेटन् हॅमिल्टनचें ऋण जाहीर न करण्यांत आणि समकालीनांविषयी तुच्छता दाखविण्यांत फडके यांनी "थोडा अतिरेकच केला" हें खरें आहे. पण अेकदा समिति बसवून साग्रसंगीत नाटक झाल्यावर फिरून त्याच विषयावर ग्रंथ लिहिण्यापर्यंत पाळी येते, म्हणजे आपल्या सार्वजनिक मूल्यांत बरीच चूकभूल आहे हें अुघड आहे. आणखी पांच वर्षांनी फडके यांनी "प्रतिभालांछन" या ग्रंथाविषयी तुच्छता दाखविल्यास फिरून देवभक्त पुस्तक लिहिणार काय ?–आणि य. गो. जोशी तें प्रकाशित करणार काय ? याचा अर्थ आमचे वाचक आणि प्रकाशक ज्या गोष्टीकरिता भुकेले आहेत तिच्या खातर तरी फडक्यांनी पुनः पुनः अशाच "साहित्यसेवेंतील स्मृति" लिहीत राहिलें पाहिजे !

श्री. के. क्षीरसागर

**तरुण भारत विशेषांक :** नागपूरच्या तरुण भारत या दैनिकाचा १९४५ चा हा वर्षारंभांक म्हणून प्रसिद्ध झालेला विशेषांक आहे. संपादकांनी आपल्या निवेदनांत अुल्लेखिलेल्या

बुद्धियोगास साजेसा असाच हा अंक निघाला आहे. सामान्य वाचकाच्या करमणुकीच्या कल्पनांच्या आहारीं न जातां भरीव वाङ्मय त्यांच्या हातीं या अंकामध्ये टाकण्यांत आलें आहे. राजकारण, अर्थकारण व वाङ्मयकारण या विविध सामाजिक अंगांवर दांत आलेले लेख विचारांना भरपूर खाद्य पुरवितात. आम्हांला राजसत्तासुद्धा चालेल (प्रा. माटे), ब्रिटिश साम्राज्यांतील हिंदी लोकांचें भवितव्य, टिळक, टॉल्स्टॉय व गांधी (शं. दा. जावडेकर), हैदराबाद संस्थानांतील मराठवाडा (श्री. वाघमारे), मार्क्सवाद व रॉयवाद (श्रीं. महाजनी), महाविदर्भ चळवळीचें रहस्य (वामणगांवकर) अित्यादि राजकारणविषयक लेखांना केवळ तात्पुरतें महत्त्व नसून ते अधिक चिरस्थायी अशा स्वरूपाचे आहेत. नागपूर विद्यापीठ आणि मराठी भाषा (डॉ. पेंडसे), मध्यप्रांत वऱ्हाडांतील संशोधन (य. खु. देशपांडे), महानुभाव व महाराष्ट्र (प्रो. कोलते) हे मराठीविषयक लेख संपादकांच्या स्वभाषाविषयक प्रेमाचे द्योतक आहेत. महात्माजी, श्री. चिटणीस, नरकेसरी अभ्यंकर अित्यादींवरील व्यक्तिपरिचयात्मक लेख, गांधीयोजना, हिंदुस्थानची शिल्लक अित्यादि अर्थविषयक लेख, त्याचप्रमाणे केळूसकर, ओक, पटवर्धन अित्यादींचीं प्रहसनें या विविध प्रकारच्या लेखांनी अंकाचें अनेकांगी स्वरूप व्यक्त होत आहे. महात्माजींचा आशीर्वाद हें अंकाचें मोठेंच भूषण आहे. अशा अंकांत बहुशः न आढळणारी काव्याची राखलेली बूज अत्यंत समाधानकारक आहे. अितक्या सर्वांगसुंदर अंकाच्या ठिकाणीं अेक दोन गोष्टी मात्र शल्यवत् वाटतात. अेक म्हणजे अितका चिरस्थायी महत्त्वाचा मजकूर छापण्यास मिळालेला असमाधानकारक कागद व दुसरें म्हणजे संपादकांच्या बुद्धियोगास न साजेल असें भविष्यकथन. पहिल्याला त्यांचा अिलाज नव्हता, पण दुसऱ्यालाहि नव्हता असें तर नाही ना ?

रा. श्री. जोग

---

## परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**सभासदांस सूचनाः— १. सोबत दि. ३१।३।४५ शनिवार रोजीं भरणाऱ्या विशेष साधारण सभा व नियामक मंडळाची सभा अशा दोहोंच्या आमंत्रणपत्रिका आहेत. सभासदांनी अवश्य पाहाव्या.**

**२. नवीन झालेल्या सभासदांचीं नांवें छापलीं आहेत. त्यांच्या सभासदत्वाला कार्यकारी मंडळाने मान्यता दिली आहे. मान्यतेचीं निराळीं पत्रें पाठविलीं जाणार नाहींत.**

—o—

परिषद् घटना नियम २७ अन्वयें श्री. न. चिं. केळकर, डॉ. प. ल. वैद्य, श्री. शं. रा. शेंडे अित्यादि ८० सभासदांनी मागणी केलेली विशेष साधारण सभा दि. ११।११।४४ रोजीं माधवराव पटवर्धन साहित्यमंदिरांत प्रा. द. वा. पोतदार यांचे अध्यक्षतेखाली भरली होती. मुंबअी विद्यापीठाने दि. ९।१० जून ४४ रोजीं जयकर समितीच्या महाराष्ट्र विद्यापीठ अहवालावर जो मतप्रदर्शनात्मक ठराव केला त्याबद्दल या सभेंत चर्चा होअून मुंबअी विद्यापीटाचा हा ठराव विघातक व निरंगत असून महाराष्ट्र विद्यापीठाच्या घडणीला विरोधी व अपायकारक आहे अशा आशयाचा ठराव पास झाला. त्याचप्रमाणे विद्यापीठाच्या वरील ठरावाचे वेळीं महाराष्ट्रहितविरोधी भागांना अुपसूचना देअून व कांही मान्य करून घेअून विरोध कमी करण्याचा प्रयत्न केला या दक्षतेबद्दल प्रा. ध. ग. गाडगीळ अित्यादिकांचें अभिनंदन करणारा ठराव संमत करण्यांत आला.

---

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने भरणारें २९ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन दि. २४, २५, २६ डिसेंबर १९४४ रोजीं धुळें येथें प्रसिद्ध साहित्यिक श्री. भा. वि. वरेरकर यांच्या अध्यक्षते-खाली भरलें. या संमेलनांत निरनिराळ्या ठिकाणांहून प्रतिनिधि आले होते. संमेलनाचें अुद्घाटन खानदेशचे श्रीमंत प्रतापशेठ यांच्या हस्तें करण्यांत आलें. स्वागताध्यक्ष श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांचें कळकळीचें भाषण झाल्यावर अध्यक्षांच्या पुरस्काराचीं भाषणें रा. टिळक, प्रा. दांडेकर, प्रा. आळते-कर अित्यादि गृहस्थांनी केलीं. त्या दिवशीं संध्याकाळीं चित्रकलासंमेलनहि मुंबअीचे प्रसिद्ध चित्रकार श्री. हळदणकर यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडलें. दुसरे दिवशीं संमेलनाध्यक्ष श्री. वरेरकर यांचें भाषण, विषयनियामक समितीच्या सभा, खुलें अधिवेशन वगैरे कार्यक्रम झाले. दि. २६ रोजींहि खुलें अधिवेशन, समारोप, आभारप्रदर्शन वगैरे कार्यक्रम यथायोग्य पार पडले. या संमेलन-प्रसंगीं चर्चाविषयकहि कार्यक्रम ठेवला होता व दररोज रात्रीं विविध करमणुकीचे कार्यक्रम आख-ण्यांत आले होते. संमेलनांत अेकंदर चोवीस ठराव संमत करण्यांत आले. त्यांत प्रचलित विविध विषयांवरील मतें व्यक्त करण्यांत आलीं आहेत. महाराष्ट्रासाठी स्वतंत्र नभोवाणीकेंद्र असावें, मराठी-तील प्रसिद्ध साहित्यिक आचार्य कालेलकर, साने गुरुजी, वामनराव जोशी यांची मुक्तता करावी, नागपूर विद्यापीठ व हायस्कूल यांच्या मराठी संस्कृत भाषांच्या अध्ययनाच्या धोरणासंबंधी सूचना, राष्ट्रीय सरकार स्थापण्याची मागणी, कागदनियंत्रण, हस्तलिखित पोथ्या वाडें सुरक्षित ठेवण्याबद्दलची व्यवस्था, दिवंगत साहित्यिकांबद्दल दुःखप्रदर्शन अित्यादि महत्त्वाच्या प्रस्तावांची चर्चा होअून त्यांबद्दल ठरावहि संमत करण्यांत आले. विशेषतः परिषद्‌संमेलन अैक्याबद्दलचा खालीं दिलेला ठराव फार महत्त्वाचा आहे. हा ठराव श्री. लालजी पेंडसे यांनी मांडला व श्री. के. नारायण काळे व श्री. अ. वि. टिळक यांनी अनुमोदन दिल्यावर संमत करण्यांत आला.

**ठराव**—"महाराष्ट्र साहित्य संमेलन व महाराष्ट्र साहित्य परिषद् या संस्था अेकात्म व्हाव्यात यासाठी अेकंदर सभासदांची संख्या निदान अेक हजार झाली पाहिजे ही परिषदेच्या विद्यमान घटनेच्या सरनाम्यांतील अट सिद्ध झाली असल्याने संमेलन व परिषद् अेकात्म होण्यासाठी परिषदेच्या घटनेंत अवश्य ती सुधारणा घडवून आणण्यासाठी परिषदेशीं सहकार्य करण्यासाठी हें अधिवेशन संमेलनाध्यक्ष श्री. वरेरकर, श्री. लालजी पेंडसे व श्री. शिवराम बाळकृष्ण कोतवाल हे तीन प्रतिनिधि नियुक्त करीत आहे. या प्रतिनिधींचें सहकार्य परिषद् अवश्य घेईल व पुढील सालचें अधिवेशन हें परिषदेच्या सामान्य वार्षिक सभेच्या स्वरूपांत दिसेल अशी या संमेलनास प्रबल आशा वाटत आहे."

संमेलन भरविण्याच्या व पार पाडण्याच्या बाबतींत धुळेकर मंडळींनी, विशेषतः श्री. देव, श्री. कोतवाल, श्री. भट, श्री. टिळक, श्री. निजसुरे, श्री. रेगे, श्री. दर्प, श्री. तरटे अित्यादींनी, फारच परिश्रम घेतले.

---

या संमेलनप्रसंगीं दि. २५-१२-४४ रोजीं परिषदेची वार्षिक साधारण सभा प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली भरली होती. सभेस २३ सभासद अुपस्थित होते. दिवंगत साहित्यिक व साहित्यसेवक यांच्या निधनाविषयीं दुःखप्रदर्शन, म. सा. परिषदेचें १९४३ सालचें अितिवृत्त व हिशेब यांस मंजुरी, परिषदेचे हिशेबतपासनीस श्री. म. वि. गोखले यांनी परिषदेला केलेल्या साहाय्याबद्दल आभार, ठरावअम्मलबजावणीचा वृत्तान्त, अनिष्ट-लेखन-समितीची अेक वर्षाची मुदत संपल्यामुळे त्या समितीचें कार्य पुढे चालविण्याची जबाबदारी परिषदेने स्वीकारूं नये या अर्थाचा ठराव अित्यादि प्रस्ताव सम्मत करण्यांत आले. आयत्या वेळच्या कामांत परिषद्-संमेलन अेकात्मते-संबंधीचा ठराव चर्चेला घेण्यांत आला व त्या बाबतींत नियम २२ अन्वयें परिषदेची विशेष साधा-रण सभा बोलाविण्याचें आश्वासन अध्यक्षांनी दिलें व त्यानंतर पुढील प्रस्ताव सर्वानुमतें संमत करण्यांत आलाः—

"ज्या पक्षीं परिषदेचे अेक हजार सभासद झाले आहेत त्या अर्थी घटनेंतील सरनाम्यांतील संमेलन परिषद् अेकात्मतेचें ध्येय सिद्ध होण्याच्या सूचनांचा विचार करण्याची वेळ व परिस्थिति प्राप्त झाली आहे असा या सभेचा अभिप्राय आहे. तरी या अेकात्मतेचें साध्य सिद्ध होण्यास घटनेंत करावयाचे फेरफार वगैरेचा विचार करण्यासाठी म. सा. परिषदेची विशेष साधारण सभा तीन महिन्यांचे आंत बोलविण्यांत यावी."

---

दि. २८-११-४४, १४-१२-४४ व १०-२-४५ या दिवशीं परिषदेच्या कार्यकारी मंडळाच्या सभा झाल्या. दि.१०-२-४५ च्या सभेंत १९४४ चा हिशोब व १९४५ चें अंदाजपत्रक मंजूर होअून पुणें येथील श्री. जी. अेम्. ओक यांची हिशेबतपासनीसांच्या जागेवर नेमणूक करण्यांत आली. त्याचप्रमाणे धुळें येथे दि. २५-१२-४४ रोजीं भरलेल्या वार्षिक सभेंतील ठरावानुसार परिषदेची विशेष साधारण सभा परिषद्-संमेलनसंबंधाविषयी विचार करण्याकरता दि. ३१ मार्च १९४५ रोजीं बोलाविण्यांत यावी असेंहि ठरलें.

---

या वर्षी डॉ माधवराव पटवर्धन यांच्या स्मृतिदिनानिमित्त गुजराथ कॉलेजमधील प्रा. गो. के. भट यांचें "माधव जूलियन् यांची काव्यव्यक्ति" या विषयावर श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली व्याख्यान झालें. या समारंभाचें उद्घाटन पुणें येथील दानशूर रा. ब. (सरदार) वि. ल. ठुबे यांच्या हस्तें झालें. त्यांनी स्मारकसमितीस रु. २०० ची देणगी दिली. सौ. वत्सलाबाई घाटे यांसह श्री. वि. द. घाटे हे अहमदाबादेहून मुद्दाम या समारंभास अुपस्थित राहण्यासाठी आले होते. संमेलनाध्यक्ष श्री. भा. वि. वरेरकर यांचा परिषदेतर्फे थाटाचा सत्कार करण्यांत आला.

प्रसिद्ध वाचनालयशास्त्रज्ञ रा. सा. रंगनाथन् यांनी परिषदेस भेट देअून कार्यकर्त्यांशीं विचार-विनिमय केला. श्री. साने गुरुजी यांनीहि परिषद्कार्यालयास भेट दिली.

---

परिषदेमार्फत झालेल्या सर्व परीक्षांचे निर्णय फेब्रुवारी महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत जाहीर होतील व लगेच त्या त्या केंद्राकडे पाठविण्यांत येतील.

---

'शैक्षणिक मानसशास्त्र' यावरील परिभाषा अध्यापनांत वापरावी अशा अर्थाचें परिपत्रक मे. अेज्युकेशन अिन्स्पेक्टर, मध्यविभाग, यांनी काढलें आहे.

आचार्य परीक्षेचा अभ्यासक्रम छापून तयार आहे.

---

# संपादकीय

मराठीमधील 'किर्लोस्कर' या सुप्रसिद्ध मासिकास नुकतींच पंचवीस वर्षे पूर्ण झालीं या-बद्दल आम्ही त्याचें मनःपूर्वक अभिनंदन करितों. अेखादें मासिक सतत पंचवीस वर्षे चालावें ही प्राथमिक गोष्टहि मराठी मासिकांच्या अितिहासांत अपवादभूतच आहे. तें नियमितपणें दर महिन्यास ठराविक दिवशीं निघत राहणें ही गोष्टहि अजूनसुद्धा अपवादभूतच म्हणावयास हवी. केवळ या दोन गोष्टी साधल्या तरी कोणत्याहि मासिकाचें अभिनंदन करणें हें अुचित, किंबहुना आवश्यक, असें कर्तव्य झालें असतें. 'किर्लोस्कर' मासिकाच्या बाबत यापेक्षाहि फार महत्त्वाचें आणि वजनदार असें कारण आहे; व तें म्हणजे तें मासिक गेलें दीड तप करीत असलेली समाजाची व साहित्याची

सेवा हें होय. ही सेवा अर्थात् विचारप्रसाराच्या रूपानें होत आहे. पन्नास वर्षांपूर्वी 'सुधारका'च्या द्वारें आगरकर ज्या प्रकारची समाजसेवा करीत होते आणि जितक्या निर्भयपणें करीत होते त्याच प्रकारची सेवा तितक्याच निर्भयपणें आज 'किर्लोस्कर' मासिक करीत आहे. बुद्धिवादाच्या आधारावर समता, न्याय आणि स्वातंत्र्य यांचा पुरस्कार ध्येयवादी दृष्टीने करीत राहण्याचें कार्य 'किर्लोस्कर' आजवर करीत राहिलें आहे. त्याच्या वाचनाने 'आपल्यास नवीन दृष्टि लाभली' किंवा 'जीवनास निराळें वळण मिळालें' असें जें अनेकांनी म्हटलें आहे तें अगदी स्वाभाविक आहे. या विचारप्रसाराचा 'किर्लोस्कर'ने निवडलेला मार्गहि मनोरंजक असल्याने सर्वसामान्य समाजास पटणारा व त्यावर परिणाम करणारा ठरतो. नवे विचार, नव्या पण आकर्षक अशा पद्धतीने मांडल्यास त्यांचा परिणाम लौकर होऊं शकतो हें 'किर्लोस्कर'ने दाखवून दिलें आहे. या नवविचारप्रसाराच्या कार्यांत त्यांना विरोध व निंदा हींहि सहन करावी लागतात, हें सर्व लोकांस माहीत आहेच. त्यांची पर्वा न करितां 'किर्लोस्कर'ने आपला मार्ग आक्रमण केला आहे. या समाजसेवेबरोबरच नवनवीन साहित्यसेवकांना प्रकाशांत आणून व त्यांचे श्रम अगदीच विनावेतन न घेतां जी साहित्याची सेवाहि 'किर्लोस्कर'ने केली आहे ती अत्यंत अभिमानास्पद अशीच आहे. 'किर्लोस्कर'च्या या यशाचें श्रेय त्याचे अत्यंत कार्यक्षम असे संपादक श्री. शं. वा. किर्लोस्कर आणि त्यांचे सहकारी यांस आहे. 'किर्लोस्कर' मासिकाचें यश उत्तरोत्तर वृद्धिंगत व्हावें असें आम्ही इच्छितों. पंचविशीचा हा टप्पा अधिक प्रौढ यौवनाचा प्रारंभ ठरेल अशी आम्हांस खात्री आहे.

* * *

जळगांव येथील परिषदेची साधारण सभा व संमेलनाचें अधिवेशन यांत मान्य झालेले परिषद्-संमेलन ऐकात्म्याचे ठराव इतरत्र दिले आहेत. त्या ठरावांतून व्यक्त झालेल्या इच्छेस अनुसरून ३१ मार्च १९४५ या दिवशीं परिषदेची नैमित्तिक साधारण सभा बोलावण्यांत आली आहे. त्या सभेपुढे चर्चेसाठी यावयाचा ठरावहि देण्यांत आला आहे. संमेलन हें परिषदेचेंच कार्य असल्याने तत्त्वतः घटनेप्रमाणे परिषद् व संमेलन यांत द्वैत नाहीच. व्यवहारांत मात्र संमेलनाच्या घटनेमुळे तें स्वतंत्र व भिन्न असें अस्तित्व धारण करून आहे, व त्या घटनेस अधिक सुसंघटित असें वळण दिलें नाही तर तें परिषदेपासून भिन्न राहीलहि. परिषद-संमेलन-ऐकात्म्याविषयी निरनिराळ्या कल्पना आहेत. ऐकात्म्याचें स्थूल स्वरूप म्हणजे संमेलनाचा अध्यक्ष हा त्यानंतरच्या वर्षी परिषदेचाहि अध्यक्ष राहावा, आणि संमेलनाने मान्य केलेले ठराव परिषदेनेहि बंधनकारक मानावे, हें होय. संमेलनाध्यक्षाची निवड जोंवर परिषदेच्या बाहेरच्या लोकांच्या मतावर अवलंबून आहे व संमेलनांत पसार होणारे ठरावहि जोंवर परिषदेच्या सभासदांव्यतिरिक्त इतर बऱ्याच लोकांनी मान्य केलेले आहेत, तोंवर वर उल्लेखिलेली ऐकात्म्याचीं लक्षणें सिद्ध होऊं शकणार नाहीत ही गोष्ट कोणालाहि मान्य होणारी आहे. संमेलनाध्यक्षाने परिषदेचा अध्यक्ष या नात्याने कोणकोणत्या गोष्टी करावयाच्या हा भाग तपशीलाचा व संमेलनाध्यक्षाच्या आवडीनिवडीवर आणि कर्तृत्वावर अवलंबून आहे. तसेंच परिषदेच्या कार्याविषयी त्याला कितपत आस्था असावी, या आस्थेचें गमक म्हणून त्याने परिषदेचा सभासद असावें की नाही, परिषदेच्या नित्यांच्या कार्यांत त्याने किती लक्ष घालावें, सभासंचालनाचें कार्य त्यास करतां यावें की नाही, तो साहित्योपजीवी असावा की कसें, हे विचार, करण्याजोगे असले तरी गौण आहेत. या सार्‍यांचा विचार अर्थात संकल्पित समितीने करावयास हवा, व त्यामध्ये परिषदेच्या सर्व सभासदांनी या समितीस विचारसाहाय्य करावयास हवें. परिषदेचे समासद आपलें हें कर्तव्य योग्य प्रकारें पार पाडतील असा आम्हांस विश्वास वाटतो.

---

## साभार स्वीकार

१९ वसुधा— ले० प. त्रिं. सहस्रबुद्धे; अभिनव प्रकाशन; मूल्य रु. ४.

२० श्रावणांतील खेडें— ले० अिग्नाजियो सिलोनी; अनुवा० व्यंकटेश वकील, अभिनव प्रकाशन; मूल्य रु. २॥.

२१ स्वातितुषार— कवि अकिंचन; प्रका० प्र. श्री. गोरे, मानव्य प्रकाशन, ७८२ सदाशिव, पुणें २; मूल्य रु. १।.

२२ ज्योति— ले० आनंदीबाअी किर्लोस्कर; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; मूल्य रु. ४.

२३ नारायणराव पेशवे यांचा खून कीं आत्महत्या— ले० व प्रका० पां. गो. रानडे, मालक, महाराष्ट्र औषधि कारखाना, १२२७ कोनवाळ गल्ली, बेळगांव; भाग १ व २, मूल्य प्रत्येकीं रु. ७.

२४ साखरगोटे— ले० रामतनय; प्रका० देशमुख आणि कं., शनवार, पुणें २; मूल्य रु.५.

२५ ओघळलेलें मंगळसूत्र— ले० रमातनय; प्रका० ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य रु. १।.

२६ हिंदूंच्या अवनतीची मीमांसा— ले० रघुनाथशास्त्री कोकजे; प्रका० र. गो. कोकजे, लोणावळें; मूल्य रु. ३.

२७ ससेमिरा— ले० त्र्यं. वि. सरदेशमुख; प्रका० म. मा. केळकर, १९६/८५ टिळक रोड, पुणें २; मूल्य रु. २॥.

२८ साहित्यविहार— ले० द. के. केळकर; प्रका० मनोहर ग्रंथमाला, पुणें २; मूल्य रु.३.

२९ काव्य आणि क्रांति— ले० आ. रा. देशपांडे; मूल्य आणे ४.

३० गोकर्णीचीं फुलें— ले० वि. स. खांडेकर; प्रका० दा. ना. मोघे, स्कूल अ‍ॅण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. २॥.

३१ थोरांच्या सहचारिणी— ले० कमल फडके; प्रका० दा. ना. मोघे, स्कूल अ‍ॅण्ड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; मूल्य रु. १॥।.

३२ वामन मल्हार वाङ्मयदर्शन— ले० वा. ल. कुलकर्णी; मुंबअी मराठी साहित्य-संघाच्या विद्यमानें; मूल्य रु. ३.

३३ प्रतिभालांछन— ले० शंकर कृष्ण देवभक्त; प्रका० रा. शं. पटवर्धन; मूल्य रु. २॥.

३४ शेजवलकरांचे लेख-प्रथम खंड— ले० त्र्यं. शं. शेजवलकर, प्रका० ह. वि. मोटे, दादर, मुंबअी; मूल्य रु. ३.

३५ महात्मा गांधी यांचें चरित्र- ले० दा. न. शिखरे; सकाळ प्रकाशन, पुणें; मूल्य रु.८.

३६ गांधी-जीवन-कथा— ले० दा. न. शिखरे; सकाळ प्रकाशन, पुणें; मूल्य रु. ३.

३७ कातर्णीचें घर— ले० यशवन्त; प्रका० रविकिरणमंडळ, दि भारत बुक स्टॉल, पॅलेस रोड, कोल्हापूर; मूल्य रु. २.

३८ छायानट— ले० रमणलाल देसाअी; अनुवा० रत्नप्रभा रणदिवे; प्रका० बा. द. सातोस्कर, बी. अे., सागरसाहित्य; मूल्य रु. ४॥.

३९ मीलन— ले० सां. घ. कंटक; प्रका० बा. द. सातोस्कर, सागरसाहित्य; मूल्य रु. २॥.

४० आई— लेखिका पर्ल बक; अनुवा० बा. द. सातोस्कर, प्रका० सातोस्कर सागरसाहित्य; मूल्य रु. ५.

४१ दाक्षांच्या देशांत— (सफर पहिली) संपा० व प्रका० बा. द. सातोस्कर; मूल्य रु. २।.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथें लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता रामचंद्र श्रीपाद जोग यांनी प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका